# निवेदन

श्री समर्थ रामदासाच्या ग्रथाचे संशोधन आणि त्याचे अहर्निश भाविकपणें चिंतन-मनन करणारे कै. नानासाहेब देव आतां ही या ग्रथाची द्वितीयावृत्ति पाहण्यास राहिले नाहीत. ही जरी एका दृष्टीने खेदाची गोष्ट वाटत असली तरी या ग्रथाची प्रथमावृत्ति नानासाहेब देवांच्या मुळे च निघालेली आहे ही गोष्ट नि संशय प्रेरणा देणारी आहे. या ग्रंथाला त्यांनीं च प्रस्तावना लिहिलेली होती. आणि तीमधें " निबंध-कारांनी लावलेली संगति सर्वतोपरि आम्हास मान्य आहे " असे हि कौतुक करून लिहिलें होते. परतु मनाच्या श्लोकांचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध अर्थात् पूर्व-योग आणि उत्तर-योग, हे जे मुख्य दोन भाग पाडण्यांत आले आहेत ते त्यांना मान्य नव्हते. त्यानी कर्म, उपासना आणि ज्ञान या त्रिकांडात्मक धोरणानी तीन भाग मानले होते. तसें मानण्यास कोणतीच हरकत नाही, ही गोष्ट उघड आहे. परंतु दोन भाग पाडण्यांत हि तशी कोणती च अडचण नाही, हे लक्षात ठेवणें अवश्य आहे.

या ग्रंथाला भाष्य हें मोठे नामाभिधान नानासाहेब देवांनी च दिलेलें आहे. त्यात त्यांची जरी लहानाचे कौतुक करण्याची वात्सल्य-वृत्ति दिसून येते तरी वास्तविक विचार करता भाष्यामधें जी सांगोपागता असावी लागते तशी ती या ग्रंथात सपूर्णपणें आहे असे मला वाटत नाही. तथापि नानासाहेब देवांनी दिलेलें नाव बदलणे ठीक नाही, या दृष्टीनें आदर-पूर्वक हें नांव कायम ठेवले आहे. मनाच्या श्लोकांची संगति आतांपर्यंत नीटपणें लावली गेली नव्हती, हें या ग्रंथाचे वैशिष्ट्य लक्षात घेऊन जरी नानासाहेबांनी याचा गौरव केला असला तरी अभ्यासकांना कळ-कळीची विनंति आहे की त्यांनी याचा कसोशीने अभ्यास करून यातल्या विषयाचा साधकभावानें अधिक उकल करावा.

असा उकल करण्याच्या दृष्टीनें, पू. विनोबाजीचें " रामदासाचीं भजनें " हें पुस्तक अभ्यासकाना फार उपयोगी पडेल. त्यातली विषय-विभागणी आणि त्यांतल्या टीपा याचा उपयोग केल्याशिवाय प्रस्तुत ग्रंथ पूर्ण अभ्यासिला असें होणार नाही. इतकें च काय पण त्यामुळें साधकाला सूक्ष्मपणें पाहिल्यास एक नवीन च दृष्टि प्राप्त होईल, म्हणून मुद्दाम हा उल्लेख करावा लागत आहे.

समर्थांचे 'मनाचे श्लोक' हे अनिम कार्य समजण्याला हरकत नाहीं. अतिशय साध्या भाषेत अध्यात्माचा अतिशय मोठा आशय त्यांनी महाराष्ट्राला दिला आहे. हे त्यांच्या कृपेचे परिपक्व फळ साधकांनी सेवन करून " आहारशुद्धौ सत्त्वशुद्धि; सत्त्वशुद्धौ ध्रुवास्मृति: स्मृतिलम्भे सर्वग्रथीनां विप्रमोक्षः " ही गोष्ट साधावयाची आहे, ती आम्हांस साधो, अशी प्रार्थना करून हे लहानसे निवेदन समाप्त करतो.

ब्रह्म-विद्या-मंदिर,
परंधाम, पवनार, (वर्धा)
ता. १२-५-१९५९

शिवाजी न. भावे

# अनुक्रमणिका

# श्री श्लोक मनाचे

# भाष्य

## संगति आणि सार



श्री समर्थांनी मनोबोध किंवा मनाचे श्लोक रचून महाराष्ट्रसाधकांना कसे मार्गदर्शन केलें, हे नव्याने सांगण्याची आवश्यकता नाही. तथापि जी गोष्ट सार्वत्रिक होते, तिच्या ज्ञानाची एकापरीने हेळसांड होऊन तिची निव्वळ बाह्य-पूजा होऊं लागते. ह्या दृष्टीनें मनाचे श्लोक केवळ म्हटले जातात. त्यांच्या अनरंगाकडे कोणी बहुधा पहात नाही. रामदासी वाङ्मयाचा अभ्यास केलेले, आस्थेने एक च एक समर्थविषय घेऊन, मॅक्स मूलर किंवा सायणाचार्यांप्रमाणे वर्षानुवर्ष त्यात लीन होणारे पू. नानासाहेब देव, यांनी अधिकृत रीतीने, मनाच्या श्लोकाचें प्रकाशन, टीपा व स्वरूपविवेचन केलेले आहे. मराठीत दादोबाच्या व्याकरणाला आद्य व्याकरणकार म्हणून जो मान आहे तो च मान पू. नानासाहेब देवाच्या समर्थविषयक लिखाणाला द्यावा लागेल. त्यानंतर इतर अनेकांनी मनाच्या श्लोकावर लिहिलें आहे.

(१) नवीन अर्थसूचन

(२) दोन अर्थांत अर्थनिर्णय

(३) विस्तार
(४) संगति
(५) सार
(६) समानार्थस्थलनिर्देशन
(७) अनुवृत्तिदर्शन
(८) भाषादि अनेक शास्त्रदृष्टचा विवरण

लिहिण्यांत असे अनेक प्रकार असतात. पू. नानासाहेब देवांनीं टीपा देऊन रामदासी वाङ्मयांतील व थोडे इतर हि, समानार्थ-स्थलनिर्देशन, किंचित् विस्तारादि गोष्टी अतिशय भाविकतेनें व सुंदर तऱ्हेनें केलेल्या च आहेत. येथे मुख्यतः संगति आणि सार पहावयाचें आहे. इतर गोष्टी ओघाने येतील तेवढचा च. शिवाय सर्व चरणसूची, पदसूची व सर्व शब्दकोश शेवटीं जोडला आहे. त्याचा हि उपयोग होईल अशी कल्पना आहे.

समर्थांनी हे श्लोक केव्हां रचले ? कोठे रचले ? व तो प्रसंग कोणता होता ? हे प्रश्न जरी बहिर्दृष्टीचे असले तरी मनांत सहज च उद्भवतात, ह्यांत शंका नाहीं. काल, स्थल, प्रसंग व कार्य-कारणभाव ह्या इतिहासाच्या बाहेरच्या दरवाजांतून च मनुष्यानें अंतरंगांत प्रवेश करावयाचा. परंतु कांही मंदिरें ह्या बहिरंगानें नटलेलीं–ह्या भव्य प्राकाराच्या आंत असलेलीं, जशी आढळतात; तशीं गांवोगांवची मारुती, महादेव इत्यादि मंदिरे मोकळी हि आढळून येतात. गेले की एकदम दर्शन ! तसा च कांहीसा प्रकार येथे आहे. 'उघडा मंत्र श्रीराम' ही जशी राम-मंत्राची गोष्ट, तशी च समर्थांच्या मनोबोधाची स्थिति आहे. काल–स्थल–प्रसंगाचा प्राकार या काव्याभोंवती मुळीं च उभा नाहीं. व उभा करण्याला फारशी सामुग्री हि नाहीं. स्वतः समर्थांनीं

ह्यासंबंधी कांही च लिहिलें नाही. फक्त हनुमतस्वामीविरचित रामदासस्वामीच्या बखरीमध्ये एतत्संबधी किंचित् उल्लेख आढळतो. (ही बखर १९१० मध्यें प्रसिद्ध झालेली पाहण्यांत आली.) समर्थांचे वडील बंधु श्रेष्ठ ह्याचें निधन झाल्यानंतर, त्यांचे दोन पुत्र रामचंद्रबाबा वय १६ वर्षे. व श्यामजी बाबा वय १० वर्षे, हे दोघे शके १६०० माघ कृष्ण प्रतिपदेस समर्थांकडे परळीस आले होते. व त्यांस परत पोचवितेवेळीं "समर्थांनी कृपा करून नीतिधर्म, उपासनाधर्म, भक्तिमार्ग व आत्मानात्मविचार उपदेशिला!" त्यानंतर लगे च छत्रपति श्रीशिवाजी महाराज समर्थांकडे येऊन, त्यास काही सेवा मागण्यासंबंधी विनंति करूं लागले परंतु समर्थांनी तिकडे विशेष लक्ष दिले नाही. तेव्हां छत्रपति खिन्न झाले. त्याचा व तेथें ठेवलेले कोंडोपंत ह्याचा एतत्संबंधी संवाद झाला. त्यात कोंडोपंत म्हणतात "महाराज, गुदस्ता किंचित् महर्गता पडली होती. आणि पंक्तीस पात्रें तर बहुत. ह्यामुळें सरकारांतून नेमलेले वेतन खर्चास पुरेना. तथापि आपणाजवळ सागण्याविषयी समर्थ आज्ञा देईनात. आणि मनाचे श्लोक* २१० आपण करून शिष्यांजवळ देऊन कोंकणांत पाठविले. आणि तेथून भिक्षा मागून तांदूळ आणविले. ह्याप्रमाणें भोजनखर्चाचा बंदोबस्त समर्थांनी करविला होता." हनुमंतस्वामीची बखर कितपत विश्वसनीय आहे, ह्याविषयी निश्चितता झालेली नाही. तीत नाना प्रकारचे चमत्कार

* कोणा प्रथम प्रकाशकाने मनाचे श्लोक २१० छापले, तेव्हा नंतर बखर छापणाराने हि बखरीत २१० चा अंक घातला. वस्तुत: मनाचे श्लोक २०५ आहेत व श्रीसमर्थवाग्देवतामंदिरात बखरीच्या ज्या जुन्या हस्तलिखित प्रती आहेत, त्यात २०५ च म्हटलेले आहे. चिटणीस, स. सभा

व भारूढ हि आढळून येतें. श्लोक हि २१० आहेत असे म्हटलें आहे. तें हि चुकीचें च आहे. केवळ भिक्षेसाठी ही श्लोकरचना झाली; ही हि गोष्ट पटण्याजोगी नाही. प्रथम श्रेष्ठांच्या मुलांना उपदेश दिल्याचा जो उल्लेख आहे, त्यावरून राष्ट्रांतील तरुण साधकांना उपयोग व्हावा म्हणून त्यांनी हे श्लोक रचले असावे व प्रसंगविशेषी शिष्याकरवी भिक्षादीकडे हि उपयोग केला असावा; असें म्हणता येईल. व सुमारें शके १६०० च्या आगेमागें परळीस किंवा आसपास च कोठें तरी एकातांत त्यांची रचना झाली असावी असें हि म्हणण्यास हरकत नाही. तथापि हीं सर्व अनुमानें च आहेत, व अंतरंगदृष्टीने त्यांचा विशेष उपयोग आहे; असें हि म्हणतां येणार नाही.

मनाचे श्लोक समर्थांनी भुजंगप्रयात वृत्तात रचलेले आहेत. मराठीत एकंदरीत ओवी, छंद किंवा वृत्त च फार. ज्ञानेश्वरांच्या सरस रचनेनें आणि प्राचीनतेमुळे ‘ओवी ज्ञानेशाची’ हा प्रवाद सर्वत्र पसरला. ओवीनंतर निरनिराळी वृत्तें वामनाने व नंतर पुष्कळांनी उपयोजिली. आर्या मोरोपंताची च. अभंग नामदेव-तुकारामांचे सरस. समर्थांनी हि सुंदर अभंग लिहिले आहेत. समर्थांनी आर्या मात्र लिहिली नाही. ज्ञानोबाची ओवी, तुकोबांचे अभंग, वामनाचे श्लोक याचा समर्थांनी भरपूर अवलंब केला आहे. तथापि त्याचे वैशिष्ठ्य दोन छंदांत किंवा वृत्तात दिसतें. अनुष्टुभ् छंद आणि भुजंगप्रयात. पैकी अनुष्टुभात मोरोपंतांनी हि पुष्कळ लिहिले आहे. त्यामुळे एका च भुजंगप्रयात वृत्तात एकसारखे प्रवाहाने समर्थांखेरीज बहुधा कोणी न लिहिल्याने भुजंगप्रयात वृत्तांतली रचना हे वृत्ताच्या दृष्टीने समार्थांचे वैशिष्ठ्य मानावें लागते.

भुजंगप्रयात वृत्ताची बारा अक्षरे सहा सहा अक्षरांवर यति. भुजंगप्रयातं चतुर्भिर्यकारैः ⏑ – – ⏑ – – ⏑ – – ⏑ – – ।
सर्वत्र यगण म्हणजे भुजंगाप्रमाणें दुमडत चालीचें हे वृत्त आहे. फक्त चार लघु अक्षरे असल्यामुळे आठ गुरु अक्षरें अगदी लांबवून मोठ्यानें म्हणण्याची उत्तम सोय यांत आहे. प्रत्येक अक्षर अतिशय आदरपूर्वक, स्पष्ट आणि मोठ्यानें म्हणणें ही मनाचे श्लोक म्हणण्याची पद्धति समर्थांना अभिप्रेत असावी.

**अती आदरें गद्य घोषें म्हणावें. ८९**

ही नामविषयक आज्ञा श्लोकांना हि लागू आहे. ह्याच भुजंग-प्रयात वृत्तासारखे फारसी करीमा वृत्त आहे.

क रि मा बि ब क्षा यि ब र्हा लि मा
⏑ – – ⏑ – – ⏑ – – ⏑ –

त्यांत फक्त शेवटचें अक्षर कमी आहे. त्या काळी फकीर वगैरे आपले सवाल ह्या छंदांत म्हणत. तसा च तऱ्हेनें हिंडत हिंडत म्हणण्याला मनाचे श्लोक उपयोगी पडलेले आहेत *

मनाच्या श्लोकांत छंदोभंग पुष्कळ ठिकाणी आढळून येतो उदाहरणें पांच सात च देऊ.

| | | |
|---|---|---|
| देहे त्यागितां | श्लोक | ८ |
| मनी मानव | ,, | १७ |
| मदे मत्सरे | ,, | ५१ |
| तुटोनि गेला | ,, | ६२ |
| स्नानभ्रष्टा | ,, | १०६ |
| नव्हे दृश्य अदृश्य | ,, | १९३ |
| वसे हृदयी | ,, | १९८ |

* राजवाडे यांचा 'रामदास' निबंध पाहणें. चिटणीस, म. सभा

ह्यावरून—
( १ ) एकाराला ऱ्हस्वत्व हि देणें
( २ ) अकाराला दीर्घत्व देणें
( ३ ) द्वित्त न लिहितां गृहीत धरणें
( ४ ) जोडाक्षरानें मागील अक्षर गुरू च व्हावें असें बंधन नसणें
( ५ ) ऱ्हस्व लिहून दीर्घ गृहीत धरणें
( ६ ) ऋ ला दीर्घत्व
( ७ ) ऋ ला जोडाक्षर समजणें

इतक्या छंदोभंगाच्या गोष्टी लक्षांत येतात. ' निरंकुशाः कवयः ' हा न्याय छंदाच्या बाबतींत हि समर्थांना लागू होतो. म्हणजे एकसारख्या नियमित वृत्तानें जो कंटाळवाणेपणा येतो; तो निघून जाण्याला ही रचना थोडी उपयोगी असावी असें दिसतें. गीतेंत हि असें वैचित्र्य आहे. वैदिक ऋषींनी छंदोरचना अशी च शिथिल आहे. थोडक्यांत समर्थांचा हा छंद भुजंगप्रयात असला तरी त्याची सरणी आर्ष छंदाप्रमाणें मोकळी आहे असें म्हणावें लागतें.

जी छंदाची गोष्ट ती च भाषेची. समर्थांची मनाच्या श्लोकांतली भाषा व्याकरणदोषांनी भरलेली आहे. हें सहज अवलोकनावरून हि लक्ष्यांत येईल. निव्वळ कांहीं शब्द च पाहूं.

| | | |
|---|---|---|
| अजामेळ | बुधी | मछर |
| अनुरेणु | देहे | मौन्यमुद्रा |
| अभ्यांतरी | पष्ट | मृत्यपंथ |
| अहिला | पुष्टीभागीं | येथासांग |
| आक्षै | प्रेषण | वादवेवाद |
| अनुर्वाच्य | रीपू | सिद्य |
| आवेक्त | इ. | इ. इ. |

पण समर्थांची च भाषा अशी आहे असें नव्हे. वामनपंडितासारख्या संस्कृत अभ्यासांत तपेंच्या तपे घालविलेल्या जाड्या पंडितानें हि आपल्या काव्यांत अगदी शुद्ध भाषा वापरली आहे असें दिसत नाही. परंतु येथे हि आर्षता हें च ह्याचें मुख्य कारण आहे. आर्ष शब्दाचा शब्दार्थ 'ऋषींची' एवढा च आहे. पण त्याचा मतलब किंवा भाव लक्षांत घेता असें दिसतें की, अतिशय स्फूर्तिदायक, कल्याणकारक आणि नवीन अशी विचाराची मांडणी जो करतो, परंतु ती करीत असतां भाषा, छंद, व्याकरणादीकडे मुद्दाम लक्ष पुरवीत नाही. त्यामुळें त्या बाबतींत स्वाभाविकपणें छंदाला, संवयीला एकंदर अनुकूल अशी भाषा तो वापरतो. ह्या भाषेला आर्ष भाषा म्हणावें ह्या भाषेचे नियम देणें कठीण. कारण नियमांनीं नियमित व्हावें असें या भाषेचें स्वरूप बसत नाही. त्यामुळें पाणिनीचें 'बहुलं छंदसि' हें च सूत्र ह्या बाबतींत बहुधा लागू पडावयाचें! वैदिक प्रक्रियेंत पाणिनी 'बहुलं छंदसि' ह्या सूत्राचा सारखा जप करतो ह्याचें कारण हि हें च असलें पाहिजे. तथापि समर्थांचे सर्व शब्द एकत्र करून, त्यांतील प्रयोग पाहून, त्यांची भाषा तपासण्याचा प्रचंड उद्योग करण्यासारखा आहे. व त्यावरून त्यांच्या भाषेचे नियम हि ठरवितां येतील. या निबंधाचीं परिशिष्टें या दृष्टीनें उपयोगी व्हावीत असा आदमास आहे. तरी समर्थांची भाषा ही आर्ष भाषा आहे असें म्हणण्यास कांही च प्रत्यवाय नाहीं. भाषेचा ओघवान् विचारांत विशेष प्रश्न येत नाहीं.

**भाषा कैशी तरी हो कां । अर्थीं तात्पर्य सज्जनां**

हें वामनपंडिताचें वचन च ह्या बाबतीत चिंत्य ठरतें. त्यामुळें, समर्थांची भाषा आर्ष भाषा आहे; म्हणजे ऋषींसारखी आहे,

ही गोष्ट लक्षांत ठेवून ती वाचावी, हें च उपयुक्त आहे. साधी, सुटसुटीत, दुरान्वय नसलेली अशी च प्राय: वाक्यपद्धति आहे.

**धरा श्रीवरा त्या हरा अंतरातें ८०**
**कळेना कळेना कळेना ढळेना १४२**

असे चमत्कारिक श्लोक हे दोन च. एकंदर भाषा प्रसन्न आहे.

मनाचे श्लोक हे जरी वृत्तबद्ध असले तरी त्याला काव्य म्हणतां येणार नाही; अशा तऱ्हेची विचारसरणी पुष्कळांच्या मनांत डोकावते. सरळ उपदेशाला काव्य कसें म्हणावें? हा त्यांच्या मनांत प्रश्न उभा राहतो. परंतु नाना रसांचा कल्लोळ उडवून सदभिरुचीचें पोषण करीत सुसंस्कार वाढविणें, हा काव्याचा हेतु जर गृहीत धरला, तर त्यांतला अंतिम उद्देश या श्लोकांच्या द्वारें पूर्ण सफळ झालेला दिसून येईल. नाना रस आणि रंजन ह्या वस्तु मात्र येथें आढळणार नाहीत. त्यामुळें काव्याचा ठराविक साचा येथें पहावयास मिळणें शक्य नाहीं. ओघवती वाणी, प्रत्ययोत्पादक शब्द, अर्थाची गंभीरता, अनुभवाची दृढता, कळकळीचें अंत:करण येथें ओतप्रोत झालेलें आहे. येथले दृष्टांतादि प्रकार रंजन आणि सौंदर्य ह्यापेक्षां प्रत्यक्ष प्रत्यय आणि हेत्वर्थ ह्याकडे ज्यास्त झुकलेले दिसतील. त्यामुळे विचाराचा ठसा मनावर अगदीं घवघवीत उमटतो. तसा इतर काव्यांत उमटत नाही. उदाहरणार्थ

**हरीभक्तिचा घाव गाजे निशाणीं**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी** ३७

असें म्हटल्याबरोबर जो देखावा पुढें उभा राहतो, मनावर ज्या गोष्टीची पकड बसते तशी

**येषां श्रीकृष्णलीला ललितगुणरसे**
**सादरो नैव कर्णौ ।**
**धिक् तान् धिक् तान् धिगेतान्**
**कथयति नितरां कीर्तनस्थो मृदंगः ।**

ह्या श्लोकानें बसत नाही. ह्यात वाणीचा विलास दिसतो येथें विलास नसून विकासाकडे दृष्टि खिळली आहे. येथे सौंदर्यापेक्षां प्राणाकडे ज्यास्त नजर आहे हें प्राणवान् काव्य आहे. 'काव्यं रसात्मकं' म्हणण्यापेक्षां 'प्राणात्मकं' ही व्याख्या येथें लागू पडेल.

**मना चंदनाचे परी तां झिजावें** ८
**जेणें मक्षिका भक्षिली जाणिवेची** १५९
**द्वितीयेसि संकेत जो दाविजेतो** १५४
**सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा** ३७

असे प्रत्ययोत्पादक दाखले येथें आढळून येतील.

**सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं** ५४
**जनीं हीत पंडीत सांडीत गेले** ११३
**दिनाचा दयाळु मनाचा मवाळु** ५६

असे सहज शब्दालंकार येथे दिसतील.

**करी वृत्ति जो संत तो संत जाणा** १६८

अशी श्लेषमय निरुक्ति येथे आढळेल. पण या सर्वांत कृत्रिमता नाही. सहजतेचा ह्या काव्याशी बेमालूम मेळ पडलेला आहे. असें हें अनुभवाच्या रसानें भरलेलें, प्राणमय, प्रत्ययोत्पादक **धर्मकाव्य** आहे.

**'जनास काय सांगणें' 'सांगावें तें आपणाला । आपणु करितां बरें'** ह्या तत्त्वावर च हा मनोबोध लिहिला असला, तरी

केवळ स्वतःच्या च मनासाठीं नाहीं. समवायसंबंधानें एकंदर मनुष्यमनाला उद्देशून हे श्लोक लिहिले आहेत.

**मनाचीं शतें ऐकतां दोष जाती**
**मतीमंद ते साधना योग्य होती**
**चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य आंगीं**
**म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी** २०५

हा श्लोक नाहीं तर निरर्थक ठरता. ह्या श्लोकांत हे श्लोक ऐकण्याचें फलित सांगितलें आहे. हे श्लोक आपण म्हणून स्वतः ऐकावयाचे, दुसऱ्यानें म्हटलेले दुसऱ्याबरोबर ऐकावयाचे, दुसऱ्याला आपल्याबरोबर ऐकवावयाचे. कारण आपलें मन तसें च दुसऱ्याचें मन अशी रचना आहे. म्हणजे ही Soliloquy असली तरी नुसती Soliloquy नाहीं. तर ही Loud Soliloquy आहे ! ह्या श्लोकांचें मनन करावयाचें, पण म्हणत म्हणत मनन करावयाचें. मोठ्यानें मनन करावयाचें, सर्वांना साक्षी ठेवून मनन करावयाचें. मोठ्यानें न म्हणतां हि मनन करण्यास हरकत आहे असें नव्हे. पण मोठ्यानें न म्हणतां च मनन करावें, असा प्रतिबंध मात्र नाही. उलट म्हणत म्हणत मनन करण्याचें महत्त्व विशेष आहे. त्याच्या योगानें वातावरणांत ते शब्द भरतात. मनावर कानाच्या द्वारें त्यांचें वारंवार आंदोलन होतें. सर्व ललित कलांत संगीत कला श्रेष्ठ मानली जाते, त्याचें कारण हि हें च आहे. ती सर्वव्यापक तत्त्वावर अधिष्ठित झाली आहे. शब्द हा आकाशाचा गुण आहे. शब्द हा थेट ब्रह्माशीं भिडण्याला कारणीभूत होतो. म्हणून च श्रवणाचें महत्त्व सर्वांत ज्यास्त. वाचून वाचून डोळे बिघडतात, डोळ्यांची शक्ति मंद होते. पण ऐकून ऐकून कानांची शक्ति मंद होत नाहीं. खरें शिक्षण किंवा ज्ञान श्रवणाच्या द्वारें च मिळतें.

बालक ऐकून ऐकून च पुष्कळ ज्ञान मिळवितें. म्हणून हे श्लोक ऐकावयाचे, म्हणावयाचे, ऐकवावयाचे व मनन करावयाचे अशी ही पद्धति आहे.

**' मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो: '**

ह्या तत्त्वाप्रमाणें मनाला च बोध करावयाचें महत्त्व काय हें अधिक सांगण्याची आवश्यकता नाही मन हा अनर्बाह्य सृष्टीतला दरवाजा आहे. तद्वारा च शोधबोधादि उलाढाली व्हावयाच्या. मनोबोध शब्दांतील बोध शब्दाचा अर्थ जागृति. गौतमाला ज्ञान झाल्यावर तो बुद्ध झाला, म्हणजे जागृत झाला. बोध आणि जागृतीचें समर्थांच्या जीवनांत फार मोठें महत्त्व आहे. हा आत्मा निजला आहे. त्याला जागृत करावयाचा आहे. ही समर्थांना चिंता लागली होती. ' सावधान ' शब्दानें त्यांच्या आयुष्यांत क्रांति केली म्हणून मनाला बोध केला आहे. मनाला जागे करण्यासाठी, सावध करण्यासाठी, हे श्लोक आहेत.

**जाग जाग स्वरुपीं लवलाहे**
**जातसे वय अमोलिक पाहे**

ही मनाला हांक मारण्यासाठी हे मनाचे श्लोक आहेत. म्हणून च अगदी प्रारंभाला च तिसऱ्या श्लोकांत

**प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ३**

येथून सुरवात केली आहे. त्याची च श्लोक ६७ ते ७६ मध्यें अनुवृत्ति केली आहे. आपण ह्या अज्ञानरात्रीत निजून राहिलों आहोंत. ती रात्र सरली. आतां बोधाची पहाट झाली. आतां उठावें, जागृत व्हावें--अशी ही कल्पना आहे. बोध शब्दानें जागृति सूचित होते. त्याप्रमाणे त्याचा ' उपदेश ' असा हि अर्थ

होतो. ह्या श्लोकांच्या द्वारें निव्वळ 'जागृति' च दर्शित होत नाही, तर उपदेश म्हणजे मार्गदर्शन हि होत आहे. म्हणून च

**गमूं पंथ आनंत या राघवाचा १**
**मना सज्जना भक्तिपंथें चि जावें २**

असे सुरवातीला च दोन चरण घालून त्यांत मार्गदर्शक 'पंथ' शब्द हि समर्थांनी घातला आहे. बोध शब्दानें जागृति आणि मार्गदर्शन, हे जे दोन अर्थ सूचित होतात, ते असे अगदीं प्रारंभीच्या चरणांवरून हि ज्ञापित झालेले आहेत समर्थांना बोध शब्द विशेष प्रिय होता असें दिसतें. त्यांनी त्यांच्या मोठ्या मननाला 'दासबोध' हें नाव दिले. तसेंच छोट्या मननाला 'मनोबोध' हें नांव दिलेलें दिसते. 'मनोबोध' हें नांव जरी श्लोकात कोठें आढळत नाहीं तरी .

**जय देव जय देव जय जय 'मनबोधा'**

ह्या मनाच्या श्लोकांच्या आरतींत तें आहे. शिवाय तापीतीरस्थ संस्कृत पंडितानें केलेल्या श्लोकांच्या संस्कृत भाषांतरांत 'मनोबोध' शब्द स्पष्ट आणला आहे.

**मनोबोधमेनं तपत्यास्तटस्थो**
**गुरो रामदासस्य दासश्चकार २०६**

मनोबोध ह्या नांवाऐवजीं आतां सर्वत्र मनाचे श्लोक हें नांव रूढ झालेंलें आहे. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव हीं नांवें जशी बदलली गेली, तसें च हें हि नांव बदललें गेलें. मनाचे श्लोक म्हणजे मनासाठीं श्लोक (मनाचेअर्थ शब्दोद्भव 'च' प्रत्यय घ्यावयाचा) म्हणजे मनासाठीं श्लोक. पू. विनोबा सारख्यांनीं साधकभावानें ह्यांचें मननचिंतन केलें. म. गांधींनीं हि ह्यांचें चिंतन केलें. आश्रमा-

दिकांत त्याचें प्रार्थनेनंतर निरूपण हि झालेले आहे. इतक्या थोर महात्म्यांस ज्यापासून बोध मिळाला; तो बोध, ते मनन, स्वत. किती थोर योग्यतेचे असले पाहिजे ह्याची कल्पना च केलेली बरी!

मनाला जागृत करीत असता तीव्र आणि सौम्य दोन्ही उपायानी जागृत करण्याची रीत आहे तीव्र रीतीनें आलेली जागृति, ही रजोगुणापासून उद्भवली असल्याकारणाने, तिच्यापासून आलेली जागृति पुन्हा तमोगुणात च परिणत होते रजोगुणाचा च तमोगुण हा पर्याय आहे म्हणून सात्त्विक आणि सौम्य उपायाने जागृत करण्याचें महत्त्व अधिक आहे. ती च पद्धति ह्या श्लोकांत समर्थांनी अंगिकारली आहे. अगदी प्रथमारंभी च 'मना सज्जना' अशा तऱ्हेने मनाला सौम्य संबोधन केलें आहे. त्याची पुढे अनुवृत्ति करून 'मना वीट मानू नको बोलण्याचा' अशी विनवणी हि मधून मधून केली आहे.

सबंद २०५ श्लोकात जी वस्तु सांगितली आहे, ती उपक्रमात बीजरूपाने स्वाभाविकपणे च येऊन गेली आहे पहिल्या तीन श्लोकात सर्व उपक्रम आला आहे. उपक्रमात प्रथम श्लोक नमनाचा आहे. ते नमन हि पुढील विस्ताराला बीजभूत आहे. गणपतीला 'गुणपति' म्हटले आहे उत्तम सद्‌गुणाचा अभ्यास तद्वारा सूचित होतो. वाणी ही मनुष्याची विशेष देणगी आहे. शारदेला नमन करण्यात वाङ्मूलाचा आदर व तद्वारा वाचाशुद्धि, जप इ चें. सूचन होतें. नमनाच्या श्लोकाचा शेवटचा चरण

**गमू पंथ आनंत या राघवाचा १**

हा आहे. ह्या चरणाच्या द्वारे मनाच्या श्लोकाचा सर्व उत्तरार्ध

(१३३ ते २०५) म्हणजे ब्रह्मज्ञानपर भाग सुचविला आहे. ह्या च भागांत

**मना संत आनंत शोधूनि पाहे** (१४६ ते १५०)

हे पंचक आलेले आहे. आनंत शब्दाचा च तो विस्तार आहे. तसे च

**मना सज्जना भक्तिपंथे चि जावें** २

ह्या चरणानें पूर्वार्ध (१ ते १३२) सगळा सूचित होतो. पूर्वार्धात प्रामुख्यानें भक्ति व उत्तरार्धात प्रामुख्यानें ब्रह्मज्ञान आलेलें आहे. तसे च

**जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें**
**जनीं वंद्य तें सर्व भावें करावें** २

ह्या श्लोकात भक्तीला अभिप्रेत नीति पूर्ण येऊन जाते. जनी शब्दावर 'सज्जनी' अशी टीप देण्याची आवश्यकता च आहे असे नाही. दुर्जन, सज्जन, सामान्य जन, तीन्ही कसोटीवर नीति कसून पाहिली पाहिजे. दुर्जन जरी दुराचार करीत असले, तरी सदाचाराची निंदा आणि दुराचाराची प्रशंसा करतात असे नव्हे. सदाचारी माणसाची द्वेषानें ते निंदा करतील. पण सदाचाराची निंदा बहुधा करणार नाहीत. सामन्य जनांना, दुर्जनांना आणि सज्जनांना हि जें निंद्य ते ओघानें च सोडून द्यावें. तेथे संदेह च नाही. निःसंदेह नीतिसूत्र म्हणून हे दोन चरण घेतां येण्याजोगे आहेत. भक्तीमध्ये ही निःसंदेह नीति गृहीत असल्यामुळे हे दोन चरण मांडलें आहेत. श्लोक ३ मध्यें '**प्रभाते मनीं राम चिंतीत जावा**' हा चरण जागृतीसाठी. बोध शब्दाच्या एका अर्थाच्या पुष्टीसाठी तर आहे च. परतु त्यांत सदाचाराचे प्रथम प्रतीक गोवण्याची दृष्टि आहे. प्रथम उठल्याबरोबर रामचिंतन करणें हा एक अतिशय आवश्यक सदाचार

आहे. अशी धर्मावर अधिष्ठिलेली निर्दोष सदाचाराची सूत्रे सभाळल्यानें मनुष्याची नीति नैष्ठिक होण्याला मदत होते व मनुष्य भक्तिमार्गांत अग्रेसर होत जातो. 'कांही न केलें तरी केवळ जपाने हि मनुष्य सिद्ध होतो '(मनु २.८७) ह्या वचनात पुष्कळ अर्थ भरलेला आहे. स्वतः समर्थांनी १२ वर्षे जपानुष्ठानादि साधना केल्यामुळे, ह्या साधनाविषयी प्रथमारंभी च उपक्रमांत त्याचा निर्देश करणे हे अगदी स्वाभाविक म्हणावें लागेल. येणेप्रमाणे राघवाच्या अनत पंथासाठीं म्हणजे, ब्रह्मज्ञानासाठी भक्तिमार्ग, भक्तिमार्गासाठी नि:संदेह नीति, नीतीसाठी सदाचार—अशी साधनपरंपरा आचरणांत आणली तर मनुष्याची काय अवस्था होईल, तो कोठें पोचेल, हें शेवटी तिसऱ्या श्लोकाच्या चवथ्या चरणांत सांगितले आहे. असा कृतार्थ झालेला 'धन्य पुरुष' कसा असतो, त्याचे विस्तृत वर्णन '**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा**' पालुपद घालून (श्लो. ४७ ते ५६) मध्ये अतिशय उत्कृष्ट तऱ्हेनें केलेले आहे. उपक्रमाच्या तीन्ही श्लोकात, काय काय गोष्टी आल्या आहेत; त्याचे परिगणन केले, म्हणजे केलेले विवेचन अधिक स्पष्ट होईल वं कांही नवीन गोष्टी हि कळतील.

(१) गणपतीला नमन मांगलिक म्हणून (१)

(२) गणपति = गुणपति. तद्वारा गुणाभ्याससूचन (१)

(३) वाङ्मूलादरार्थ शारदानमन (१)

(४) तद्वारा वाचाशुद्धि, जप इ. सूचन (१)

(५) 'आनंत पंथ' शब्दद्वारा उत्तरार्धसूचन (१)

(६) 'मनोबोध' शब्दांतील बोध म्ह. मार्गदर्शन ह्या अर्थाच्या पुष्टीकरणार्थ 'पथ' (१ व २) शब्द

( ७ ) 'राघवाचा' (१) म्हणण्यांत रामदासानी राम अनन्य इष्ट दैवत ठरविण्याची दृष्टि. (एतत्संबंधी विस्तृत विवेचन पूर्वार्धाच्या शेवटी पहावे )

( ८ ) 'सज्जना' (२) संबोधनाने मनोपदेशाची सौम्य तऱ्हा.

( ९ ) 'तरी श्रीहरी' (२) शब्दाने इतर उपास्यात अभेददर्शन

(१०) 'भक्तिपथे' ( २ ) हे सर्व पूर्वार्धाचे बीज.

(११) श्लोक (२) उत्तरार्थ—भक्तिपथांतर्गत नि:संदेह नीति सूत्र.

(१२) श्लोक (३) पहिला चरण. 'मनोबोध' शब्दातील 'बोध' म्हणजे जागृतीचें सूचन.

(१३) श्लोक (३) पहिला चरण भक्ति आणि नीतीला पोषक सदाचाराचा प्रथम पाठ.

(१४) श्लोक (३) शेवटचा चरण. मानव्याची धन्य अवस्था. ह्या उपक्रमाच्या तीन श्लोकांतून आपणाला हे १४ मुद्दे दिसून श्लोकांतील बीज उघड झाले. प्रथम ब्रह्मज्ञान हे ध्येय, (१) त्याची तयारी भक्ति, (२) तिच्यासाठी नीति, (२) नीतिसाठी सदाचार (३) अशा पायरीने उपक्रम करून शेवटी (३) धन्यता दर्शविली आहे. मनाच्या श्लोकाचा उपक्रम अशा तऱ्हेने अतिशय बुद्धियुक्त आणि सुंदर तऱ्हेचा झालेला आहे. सहजस्फूर्तीने च तो तसा घडला गेला आहे असें आढळून येईल !

तीन श्लोकात उपक्रम केल्यानंतर विस्तृत उपदेशाला चौथ्या श्लोकापासून सुरवात होते. ४–५ ह्या दोन श्लोकात मनाच्या हालचालीचें बिनचूक पृथक्करण झालेलें आहे. आधीं मनाची हालचाल होते, तिला वासनास्वरूप येतें. मनांत कल्पना वसली

म्हणजे वासना झाली ( वस् धातूपासून च वासना शब्द झाला ). ती सदसत् दोन्ही तऱ्हेची असू शकेल नंतर बुद्धीत तत्संबंधी निश्चय होतो व त्यानंतर ती गोष्ट कृतीच्या द्वारे जगात प्रकट होते. ती नीतीची किंवा अनीतीची, धर्माची किंवा अधर्माची कोणत्या हि तऱ्हेची असू शकेल जर नीति व धर्माची जरूर असेल तर विचार हे साधन आहे ( **मना अतरीं सार बीचार राहो ४** ) विचाराधीन मन असावें म्हणजे तदनुसार वासना, बुद्धि व क्रिया होईल हा चौथ्या श्लोकाचा भावार्थ आहे बुद्धीत एखादी गोष्ट ठमली तरी तद-नुसार क्रियेसाठी संकल्प लागतो आणि मनात वासना शिरण्याला तद्विषयक कल्पना आधी लागते ह्या दोन गोष्टी चौथ्या श्लोकांत सांगितल्या नाहीत त्या पांचव्या श्लोकात आणल्या आहेत. ४ थ्या श्लोकात शेवटी विचारशीलतेचा उपदेश केला आहे, तर पाचव्या श्लोकात विकारशीलतेचा अनर्थ दाखविला आहे.

कल्पना वासना बुद्धि संकल्प क्रिया

अशी ही मनाच्या हालचालीची श्रेणी आहे जर विचारशील व्हाल तर ह्या श्रेणीने धर्म व नीति (४) गाठता येईल विकारशील व्हाल तर ह्या च श्रेणीने लोकांत छी थू होईल थोडक्यांत ४–५ श्लोकाचा हा अर्थ आहे.

ह्या दोन श्लोकातील गोष्टीचा पुढे ठिकठिकाणी अनुवाद केलेला आढळून येईल उदाहरणार्थ वासनाविषयक श्लोक ४, १३, २१, ५८, ६५, १२८ ह्यातील विधाने पहा बुद्धीविषयी परिशिष्टांतील अंक पाहिल्यास तद्विषयक विधि किंवा वर्णन त्या त्या अंकात आढळून येईल. नीति आणि विचारविषयक अंक हि पाहतां येतील. मनाच्या श्लोकांत विचार म्हणजे 'शोधून

पाहण्याची वृत्ति ' असा अर्थ समर्थांना अभिप्रेत आहे. विचाराचें कार्य संशोधन व बोध. उदा०

**विचारें मना तूं चि शोधूनि पाहे** ११
**विचारें बरें अंतरा बोधवीजे** ४१
**विचारें तुझा तूं चि शोधूनि पाहे** ११४
**विवेकें विचारें विवंचूनि पाहें** १७३

'**मना पापसंकल्प सोडूनि द्यावा** ' ह्या चरणाची '**सदा सत्यसंकल्प जीवीं धरावा** ' ही विधायक बाजू लक्षांत ठेवण्याजोगी आहे, म्हणून च ती मुद्दाम

**सदा सत्यसंकल्प चित्तीं वसावा** १३०

अशा रीतीनें शेंवटीं आणली आहे.

**मना कल्पना ते नको वीषयांची** ५
**मना कल्पनालेश तो ही नसावा** ५८

ह्या दोन चरणांतील साधनांची चढती पायरी लक्ष वेधून घेते. त्याचप्रमाणें

**विकारें घडे हो जनीं सर्व ची ची** ५
**अती विषई सर्वदा दैन्यवाणा** ६४

हें साम्य पहावें. 'ची ची ' हा प्रयोग श्लोक १०१ मध्यें हि असा च आला आहे. परिशिष्टें अशीं साधर्म्य वैधर्म्य पाहण्याला उपयोगी पडतील.

विचार आणि विकारांचा मनाच्या श्रेणीवरील परिणाम थोडक्यांत मांडला तरी विकारांचें ६ व्या श्लोकांत स्वतंत्र वर्णन केलें आहे. क्रोध हा त्यांत प्रथम घेतलेला आहे व लोभाचा उल्लेख नाहीं. हे दोन विशेष त्यांत दिसतात. पहिल्या विशेषांत

श्रीसमर्थांचें स्वत:चें चरित्रविषयक रहस्य लपलेलें आहे. दुसऱ्याचा स्वतंत्रपणें ९ व्या श्लोकांत द्रव्याच्या द्वारें उल्लेख केल्यामुळें ह्या श्लोकांत तो नाहीं. बहुधा विषयी जीवाला काम हा विशेष स्वरूपांत त्रास देत असतो. परंतु बाल्यापासून विषयत्याग केलेल्या समर्थांसारख्यांना कामाचा स्पर्श होणें दुरापास्त. त्यांना साधकावस्थेंत क्रोधापासून त्रास झाला असावा असें दिसतें. धन्य पुरुषाच्या वर्णनांत हि शेंवटीं '**तया अंतरीं क्रोध संताप कैंचा**' (५६) असें वर्णन करण्यांत हा च मतलब दिसतो. संन्यासी, तापसी, ब्रह्मचारी इत्यादिकांना क्रोधाचा झपाटा विशेष ग्रासतो. समर्थ स्वत: त्याच मार्गांतले असल्यामुळें क्रोध त्यांच्या पहिल्या प्रथम नजरेस पडला असें दिसतें.

**नको रे मना क्रोध हा खेदकारी**
**नको रे मना काम नाना विकारी**

ह्यांतील 'क्रोध व काम' शब्द काढून अनुक्रमें वाद आणि भेद शब्द घालून १६० व्या श्लोकांत दोन चरण आलेले आहेत. क्रोधाचा वाद व कामाचा भेद हा परिणाम चिंत्य नाहीं असें कोण म्हणेल ?

ह्या विकारांतून सुटण्यासाठीं मागें विचार हें साधन सांगितलें च पण त्याला जोड देण्यासाठीं अतिशय उत्कृष्ट साधनें दोन श्लोकांत सांगतात. लोकांचे नीच बोल हि सहन करणें व आपण नम्र भाषण करून बहुधा तद्द्वारें लोकांना संतोष देणें हें पहिलें साधन दाखविलें. जनसेवेचें मुख्य सूत्र ह्यांत आलेलें आहे. नम्रता आणि सहन करणें ह्यांत च खरें धारिष्ट आहे, ही धारिष्टाची कल्पना हि ह्यांत आपणांस मिळते. राष्ट्रांत जर लोकसेवा हवी

असेल, तर नम्रतेची आणि सहन करण्याची आवश्यकता आहे. विकारांतून सुटावयाचें असलें तरी हि जगापुढें नम्र होऊन सेवा करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. लोकसेवेनें विकार झिजतील. ते पूर्ण शमण्यासाठीं ८ व्या श्लोकांत आणखी दुसरा उपाय सांगतात. कृति अशी करावी कीं, त्या कृतीचा, देह गेला तरी, परिणाम उरावा. कृतीचा परिणाम म्हणजे च कीर्ति. आपली प्रत्येक कृति नष्ट च व्हावयाची आहे. ती टाकावयाची च आहे. धरून ठेवावयाची नाहीं. परंतु तिचा मागें अपेक्षित परिणाम राहिला पाहिजे.

**मना मानवाची नको कीर्ति तूं रे** १८

ह्या चरणांत स्वतःची किंवा कोणत्या हि मानवाची कीर्ति मेल्यानंतर उरावी, ह्या वासनेचा निषेध दिसत आहे. कृतीची कीर्ति उरावी. कर्त्याशीं त्याचा संबंध च नको. ह्या दृष्टीनें

**देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी**
**मना सज्जना हे चि क्रीया धरावी** ८

म्हणजे क्रियेची, देह गेला तरी, कीर्ति उरली पाहिजे, असा अर्थ करावयास पाहिजे. अशी प्राणवान् कृति आणि सज्जनांची चंदनाप्रमाणें झिजून सेवा करणें, ह्या दोन गोष्टींनीं विकार शमतील.

**जना सज्जनालागि संतोषवावें** १०२

हा चरण पुन्हां आलेला आहे हें लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. प्राणवान् कृतीशिवाय सज्जन संतुष्ट होणार नाहींत हा उपसिद्धांत हि ह्यांतून आपणास मिळतो.

ह्या पुढचा श्लोक (९) लोभविषयक, द्रव्यविषयक किंवा स्वार्थविषयक आहे. स्वार्थामुळें सर्व विकारांना मनुष्य बळी पडतो

व तेवढ्यासाठीं च द्रव्यादिकांचा लोभ असतो. एतदर्थ हा स्वतंत्र श्लोक योजलेला दिसतो.

विकारनाशार्थ विचार, लोकसेवा, सत्कृति, सज्जनसेवा, इतकें सगळें करून हि "**जो जो प्रयत्न रामावीण। तो तो दुःखासी कारण**" हा समर्थांचा अनुभव असल्यामुळें (१०) येथें रामप्रेम विकार शमनार्थ मुद्दाम सांगितलें आहे.

**धरी रे मना आदरें प्रीति रामीं** ६५

ह्या पुढें त्याचा अनुवाद आलेला आहे.

परंतु रामप्रेमाच्या आड एक वस्तु येत असते. ती म्हणजे सुखप्रेम. सुखप्रेम सुटून रामप्रेम लाभावयाचें कसें? त्याचा कांहीं तरी बिनियोग दाखविला पाहिजे. म्हणून ह्या च श्लोकांत (१०) तितिक्षा सांगतात. देहदुःख सुख मानण्याचा अभ्यास करावा असें तत्संबंधीं साधन हि ह्या च श्लोकांत सांगितलें आहे. ह्या श्लोकांतील शेवटचा चरण तसा च १४५ मध्यें हि आला आहे.

श्लोक ४ ते १० पर्यंत मनाची श्रेणी, विकार व त्यांच्या शमनार्थ पुढील सहा उपाय सांगितले.

| | |
|---|---|
| (१) विचार | (४) सज्जनसंतोष |
| (२) लोकसेवा | (५) रामप्रेम |
| (३) प्राणवान् कृति | (६) तितिक्षा |

ह्या पुढील ११-१२ श्लोकांत सुखदुःख विचार मांडला आहे. त्यांत पुढील गोष्टी आल्या आहेत.

(१) पूर्ण सुखी कोणी असणें शक्यनाहीं ११
(२) सुखदुःख हे संचितभोग आहेत ११

सुखदुःख सोडण्यास साधनें---

(३) दुःखाचें चिंतन सोडणें १२
(४) देहबुद्धि सोडणें १२
(५) विदेहीपणाचा अभ्यास करणें १२

१३ ते १७ पांच श्लोकांत कालस्वरूप दाखवून त्यामुळें मिळणारा बोध दाखविला आहे.

(१) अतिशक्तिमान हि कालवश होतात १३
(२) थोर हि कालवश होतात १४
(३) सर्वच १५
(४) क्रमानें मागें पुढें कालवश होतात १६

म्हणून

(१) वासना १३ (२) अहंकार १५
(३) लोभ १६ (४) चिंता १७

ह्यांचा त्याग केला पाहिजे.

रावणासारखे दुष्ट हि मरतात म्हणून त्यांच्यासारखी दुष्ट वासना नको १३
थोर हि कालवश होतात म्हणून थोरपणाचा अहंकार नको १५
सर्व च कालवश होतात म्हणून कशाचा च लोभ नको १६
क्रमानें कालवशता यावयाची च आहे म्हणून चिंता किंवा खेद नको, असा मोठ्या खुबीनें परस्परसंबंध ह्यांत समर्थांनीं अंतर्भूत केला आहे.

मनाची श्रेणी, विकारशमनार्थ उपाय, सुखदुःखविवेक आणि कालस्वरूप दाखविल्यानंतर दोन श्लोकांत वाङमयविषयक उपदेश केला आहे.

**सद सर्वदा प्रीति रामीं धरावी १०**

ह्या उपायाचा हा विस्तार आहे. मनांतलें प्रेम आतां वाणींत उतरावयास सांगितलें आहे.

१८ व्या श्लोकांत (१) रामाशिवाय सर्व आशा सोडणें, (२) रामाचें च वर्णन करणें, (३) मानवकीर्तीचा त्याग, ह्या तीन गोष्टी सांगून त्यांचा च आणखी विस्तार १९ व्या श्लोकांत केलेला आहे. रामाशिवाय वाचेला वर्ण्य विषय कोणता हि नको, ही गोष्ट खरी असली, तरी सत्यप्रतिपादन हें हि रामवर्णनांत येतें. आणि सत्य म्हणजे काय तर "जें सत्य तें च सत्य." अमुक काळीं, अमुक प्रसंगीं, असत्य हि सत्य होईल, किंवा सत्याला अमुक अपवाद असतात, वगैरे कल्पना न मांडतां स्पष्ट जें सत्य तें च सत्य अशी निर्भेळ सत्याची कल्पना येथें समर्थांनीं मांडली आहे. (१९)

२०–२१ ह्या श्लोकांत जन्मस्वरूप म्हणजे गर्भवासस्वरूप वर्णन केलें. कालस्वरूपाचें म्हणजे मृत्युस्वरूपाचें जसें वर्णन केलें, तसें च हें जन्मस्वरूपाचें येथें वर्णन केलें आहे. कालस्वरूप प्रत्यक्ष दिसतें. त्याची भीषणता चोहोंकडे प्रतीतीला येते. त्यामुळें लवकर पटण्याच्या दृष्टीनें त्याचें वर्णन अगोदर केलें. आतां येथें गर्भवासाची भीषणता दाखविली. २० व्या श्लोकांत भीषणता व २१ व्या श्लोकांत गर्भवासाचीं कारणें (१) वासना (२) कामना (३) द्रव्यदारा, अशा स्वरूपांत आलेलीं आहेत.

उपक्रम, मनाचें स्वरूप, विकार व त्यांतून सुटण्याचे उपाय, सुखदु:खविवेक, मृत्यूचें स्वरूप, रामकीर्तन, जन्मस्वरूप– २१ श्लोकांत हें सर्व वर्णन अगदीं थोडक्यांत सुंदर क्रमानें आलेलें आहे.

ह्यापुढें पांच श्लोकांत पुन्हां पूर्वीच्या गोष्टींचें सूत्र तसें च चालू रहावें ह्या हेतूनें व सुख आणि काळ दोहोंचें स्वरूप मनापुढें ठेवल्यानें सुखाची लालसा कमी होऊन तें रामभक्तीकडे वळेल म्हणून सुखाची क्षणभंगुरता आणि काळाची धांव सांगितली आहे. तसें च अहंकाराचा उल्लेख हि केलेला आहे.

**घडीनें घडी काळ आयुष्य नेतो** २३
**परी सेवटीं काळ घेऊनि गेला** २६
**सुखाची घडी लोटतां सूख आहे** २५
**अहंता मनीं पापिणी ते नसो दे** २४

ह्या चरणांवरून ही गोष्ट उघड होईल. ह्याशिवाय रामभक्तीसंबंधीं २२ व्या श्लोकांत

**रघूनायका दृढ चित्तीं धरावें** २२

ह्या चरणाच्या द्वारें ( १ ) रामचिंतन,

**न बोले मना राघवेंवीण कांहीं** २३

ह्या चरणाच्या द्वारें ( २ ) रामवर्णन आणि

**सदा सर्वदा नाम वाचे वसों दे** २४

ह्या चरणाच्या द्वारें ( ३ ) नामजप, हीं एकामागून एक तीन साधनें भक्तीसाठीं दाखविलीं व तद्द्वारा श्लोक २६ मध्ये

**करीं रे मना भक्ति या राघवाची** २६

अशी आज्ञा केली. २२ व्या श्लोकांत

**महाराज तो स्वामि वायूसुताचा**
**जना उधरी नाथ लोकत्रयाचा** २२

हे दोन चरण म्हणजे पुढील

## नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ( २८-३७ )

ह्या दशकाची थोडक्यांत प्रस्तावना आहे. श्लोक २७ मध्यें हि ही प्रस्तावना आहे. ही प्रस्तावना कशी ? हें थोडें पुढें गेल्यावर समजणार आहे. श्लोक २६ मधील '**पुढें अंतरीं सोडि चिंता भवाची**' हा चरण फार महत्त्वाचा आहे. ह्या चरणाच्या द्वारें मागील सर्व श्लोकांचा थोडक्यांत उल्लेख आला आहे. विकार, सुखदुःख, मृत्यु, गर्भवास--हें सर्व आतांपर्यंतचें वर्णन, म्हणजे संसारवर्णन झालें. संसाराचें हें च स्वरूप आहे. तेव्हां ह्या सर्व वर्णनावरून साधकाला आपल्या साधनेसंबंधीं धाकधूक उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. म्हणून २७ व्या श्लोकांत श्रीरामाचें आश्वासन सांगितलें आहे व पुढील दशक तर ह्या च आश्वासनानें भरलेलें आहे. त्याशिवाय ह्या पांच श्लोकांत मनाची विनवणी हि आली आहे ( २२-२५ ). म्हणजे

( १ ) मनाची विनवणी २२, २५
( २ ) भक्तीचीं साधनें चिंतन २२, कीर्तन २३, जप २४
( ३ ) कालस्वरूप २३, २६, २५
( ४ ) सुखाची क्षणभंगुरता २५
( ५ ) निरहंकारतेची आवश्यकता २४
( ६ ) मागील सर्व वर्णनाचा " भव " हा उल्लेख २६
( ७ ) संसारचिंतेंतून सोडविणारें आश्वासन २७
( ८ ) पुढील दशकाची प्रस्तावना २२, २७

इतक्या आठ गोष्टी ह्या पांच श्लोकांत आल्या आहेत. ह्या पांची श्लोकांना पूर्ववर्णनाची समाप्ति व नवीन उपक्रम असें सांध्याचें स्वरूप आहे. तरी या प्रकरणाच्या सुरवातीला २२ व्या श्लोकांत 'वायूसुताचा स्वामी' आणि प्रकरणाच्या अंतीं 'रघूनायकासारिखा स्वामि'

असे उपक्रमोपसंहारांत दोन्ही ठिकाणीं स्वामि शब्द वापरून पुढील दशकांतील 'दासत्व' दर्शविलें आहे. २२ व २७ मधली पुढील दशकाची प्रस्तावना 'स्वामि' शब्दानें दर्शित होते. म्हणून हे श्लोक पुढील उपक्रमाकडे च ज्यास्त झुकलेले आहेत.

राम आपला स्वामि आहे. आपण त्याचे दास आहोंत. आपल्याला विकारमय, सुखदुःखमय, जन्ममृत्यूच्या भीषणतेनें भरलेल्या संसाराची भीति कसली? असें आश्वासन देणारें (२८ ते ३७) हें दशक आतां सुरू झालें. हें मनाच्या श्लोकांतील पहिलें च दशक.

**'नुपेक्षी कदा राम दासाभिमानी'**

हें पालुपद घालून हें दशक तयार केलें आहे. ११६ ते १२५ मध्यें हि असें च दशक आहे. परंतु 'देव भक्ताभिमानी' असा फरक केला आहे. ह्या श्लोकांची च छाप तेथें पडलेली आहे. उदाहरणें निरनिराळ्या अवतारांचीं घेतलेलीं आहेत. अहल्येचा दाखला तर तेथें हि या दशकांतला च आला आहे व मुद्दाम शेंवटीं 'देव भक्ताभिमानी' न म्हणता 'राम दासाभिमानी' म्हटलें आहे. ह्या दहा श्लोकांत रामाच्या चरित्रांतले जे दाखले दिले आहेत, त्यांत एक मौज आहे. अगदीं आरंभीचा एक दाखला व शेंवटचा एक दाखला अशी पद्धति धरली आहे. तेणेंकरून साद्यंत रामचरित्र डोळ्यापुढें उभें करण्याची दृष्टि दिसते. श्लो. २८ मध्यें राम हा प्रथम बाल्यकालांत राक्षसनाशार्थ मुनिमखरक्षणार्थ कोदंड धारण करतो हा देखावा आहे व लगे च श्लोक. २९ मध्यें

**पुरी वाइली सर्व जेणें विमानीं** २९

असा शेंवटचा प्रसंग वर्णन केला आहे. तसें च

**अहल्या शिळा राघवें मुक्त केली** ३२

हा प्रथमचा दाखला देऊन ३३ व्या श्लोकांत

**चिरंजीव केले जनीं दास दोनी** ३३

हा पुन्हां शेंवटचा प्रसंग उभा केला आहे. त्यांत हि पुन्हां दोन्ही उदाहरणें देण्यांत विशिष्ट हेतु आहे. रामाला पाहून " काळ पोटीं थरारी " हें विधान २८ व्या श्लोकांत केलें आहे. त्याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणून ' पुरी वाइली ' हा आधार दिला आहे. काळाच्या मगरमिठींतून सर्व पुरी च सोडवली! परंतु स्वर्गांतून हि पुन्हां मृत्यु-लोकीं यावें लागतें म्हणून, येथें च आपल्या दासांना चिरंजीव केल्याचें दाखविलें. श्लोक २८ मधील पूर्वार्धाचा अनुवाद ६८ मध्यें आला आहे. तसें च

**पदीं राघवाचे सदा ब्रीद गाजे** २९

**दिनानाथ हें तोडरीं ब्रीद गाजे** ४२

हें साम्य बघण्याजोगें आहे. श्लोक ३० हा रामचरित्राचें उदाहरण न देतां स्वतंत्रपणें, अतिशय जोरदार रीतीनें दासाला आश्वासन देण्यासाठीं रचला आहे. श्लोक ३१ मध्यें रामावताराचें देवमोचनाचें कार्य दाखविलें आहे. १२३ मध्यें

**कुढावा पुढें देव बंदी तयातें** १२३

ही त्याची छाया आली आहे. श्लोक ३१ मधील

**जयातें स्मरे शैलजा शूळपाणी** ३१

याला सदृश चरण

**जपे आदरे पार्वती विश्वमाता** ९४

**सदाशीव चिंतीतसे देवदेवा** ७३

इ. इ. पुढें पहावें. श्लोक ३२ मधील

**जया वर्णितां सीणली वेदवाणी** ३२

हा चरण १२५ मध्यें तसाच्या तसा च आलेला आहे. ३४, ३५, ३६, ह्या श्लोकांवर स्पष्टपणें भगवद्गीतेची छाया पडली आहे. श्लो. २८ ते ३३ रामचरित्राच्या द्वारें आश्वासन, व ३४ ते ३६ कृष्णोपदेशाच्या द्वारें आश्वासन अशी रचना दिसते. ३७ वा श्लोक ह्या दशकाचा उपसंहाराचा आहे.

**शिरीं भार वाहेन बोले पुराणीं ३४**
**योगक्षेमं वहाम्यहम्** (गी. ९/२२)
**असे हो जया अंतरीं भाव जैसा**
**वसे हो तया अंतरीं देव तैसा ३५**
**ये यथा मां प्रपद्यन्ते** (गी. ४/११)
**अनन्यास रक्षीतसे चापपाणी ३५**
**अनन्याश्चितयन्तो मां** (गी. ९/२२)
**सदा सर्वदा देव संन्नीध आहे ३६**
**ईश्वरः सर्व भूतानां** (गी. १८/६१)

३४, ३५, ३६ ह्या श्लोकांवर गीतेची छाया कशी पडली आहे हें दिलेल्या उदाहरणांवरून स्पष्ट होईल. चक्रवाकाचा दृष्टांत देऊन ह्या प्रकरणाची समाप्ति केली आहे. उपक्रमांतील २७ मधील ‘ स्वामी ’ शब्द येथें हि उपसंहारांत आला आहे हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे.

**सदा सर्वदा देव सन्नीध आहे** ३६

ह्या चरणाशीं तुल्य

**सदा सर्वदा राम सन्नीध आहे** १८६

त्याचप्रमाणें श्लोक ३७ व १२३ हे एकत्र पहावे. ह्या दशकांत

· (१) रामचरित्रद्वारें आश्वासन
(२) कृष्णोपदेशद्वारें आश्वासन
(३) रामचरित्रांतील दाखल्यांतील रामचरित्रदर्शक खुबी.

ह्या तीन गोष्टी एकदम लक्ष वेधून घेतात.

संसाराच्या भीषण दर्शनानें (श्लो. ४ ते २७) भयभीत झालेल्या मनाला (श्लो. २८ ते ३७) आश्वासन मिळाल्यावर आतां मनाची आपल्या इष्ट वस्तूच्या ठिकाणीं स्थिर राहण्याची तयारी होणें क्रमप्राप्त च आहे. एवढ्यासाठी माझ्या पाठीशीं राम आहे हा जिवंत विश्वास बाणल्यावर रामाच्या ठिकाणीं च वस्ति करण्याचा पुढील श्लोकपंचकांत उपदेश केला आहे. व त्यासाठीं पुन्हां मध्यें साधना हि गोवून दिली आहे. रामाच्या ठिकाणीं वस्ति करावयाची तर पुढील गोष्टीची आवश्यकता आहे.

(१) भक्तीची अतिशयता (२) चांचल्यत्याग
(३) ध्यान (४) वासनात्याग ४०
(५) स्थिरता ४१ (६) बोधाचा शोध ४१

बोधाशिवाय स्थिरता नाहीं. स्थिरतेशिवाय वासनात्याग नाहीं. वासनात्यागाशिवाय ध्यान नाहीं, ध्यानाशिवाय चांचल्यत्याग नाहीं आणि चांचल्यत्यागाशिवाय भक्तीची परकाष्ठा गांठता येणार नाहीं व ती गांठली नाहीं तर रामाच्या ठिकाणीं राहतां येणार नाहीं—अशी ही सुंदर कार्यकारणमालिका आहे. ४२ वा श्लोक उपसंहाराचा आहे.

**मना सज्जना राघवीं वस्ति कीजे** १२८

हें जें ह्या पंचकाचें पालुपद त्याच्याशीं

**मना सज्जना सज्जनीं वस्ति कीजे**

हा चरण तुलनेनें पहावा.

**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी**

व

**मना सज्जना राघवीं वस्ति कीजे**

हा दोन एकामागून एक पालुपद असलेला मनाच्या श्लोकांत एवढा च भाग आहे.

रामाच्या ठिकाणीं मनानें वस्ति करण्यासंबंधींचा उपदेश झाल्यानंतर साधकानें जनांत कसें रहावें ह्यासंबंधींची कल्पना चार श्लोकांत दाखविली आहे. ह्या प्रत्येक श्लोकांत 'जनीं' हा शब्द आला आहे.

(१) जनांत हितदृष्टि ठेवणें ४३
(२) रामाशिवाय न बोलणें ४३
(३) मौन ४४
(४) रामकथा ४४
(५) अरण्य म्ह. एकांतसेवन ४४
(६) दु:संगत्याग ४५
(७) क्षणार्धमपि व्यर्थं न नयेम् । ४६

असे सात मुद्दे ह्या चार श्लोकांत आलेले आहेत. पैकीं ज्यास्त मुद्दे सांगितले असल्यामुळें ४४ वा श्लोक अधिक महत्त्वाचा झाला आहे.

**जयाचेनि संगें समाधान भंगे** ४५

ह्याच्या अगदीं उलट

**जयाचेनि योगें समाधान बाणे** ३९

हा चरण पहावा.

मनाची श्रेणी, विकार, सुखदु:खें, कालस्वरूप आणि गर्भवास म्हणजे च संसार. ह्या संसाराचें नीट अवलोकन केलें. त्यांतून सुटण्यासाठीं लोकसेवा, सज्जनसेवा, रामभक्ति इत्यादि उपाय पाहिले. संसाराच्या भीषणतेला तोंड देण्यासाठीं कोदंडधारी रामाचें आश्वासन मिळविलें. त्यानंतर त्याच्या च ठिकाणीं वस्ति करून, जनांमध्यें हितदृष्टीनें वागल्यानंतर 'या च देहीं या च डोळा' मनुष्याला धन्यता प्राप्त झाली आहे; हें आतां समर्थ दाखवितात. ह्या वर्णनांत समर्थांनीं आपला आदर्श दाखविला आहे. हें आदर्श पुरुषाचें वर्णन जगांतल्या धन्य पुरुषाचें माना कीं सर्वोत्तमाच्या दासाचें माना अर्थ एक च आहे. कारण हा धन्य पुरुष असून दास आहे. त्याला देवाच्या दास्यत्वानें ही धन्यता प्राप्त झाली आहे. धन्यता आणि देवाचें दास्यत्व ह्यांचा अनन्य संबंध आहे. म्हणून प्रथम च

**मनीं लोचनीं श्रीहरी तो चि पाहे** ४७

सर्वत्र तो अंतर्बाह्य देवाचें दर्शन घेत असतो. ज्या देवाच्या दास्यत्वानें धन्यता प्राप्त झाली, त्याचें सर्वत्र दर्शन घेणें ही प्रथम महत्त्वाची वस्तु नव्हे काय?—असा तो देव—त्याला सर्वोत्तम म्हटलें आहे.

**एतावानस्य महिमा अतो ज्यायांश्च पूरुषः** (पुरुषसूक्त)

—अशी त्याची उत्तमता आहे. गीतेंत हि

**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः** (गी. $\frac{१५}{१८}$)

अशी त्याची पुरुषोत्तम संज्ञा केली आहे. समर्थांचें उपास्यदैवत तर मर्यादापुरुषोत्तम म्हणून प्रसिद्ध च आहे.

(१) सर्वांत त्याचा महिमा थोर म्हणून

(२) क्षराक्षरापलीकडचा पुरुष म्हणून

(३) मर्यादापुरुषोत्तम म्हणून

म्हणजे महिम्याच्या दृष्टीनें, क्षराक्षरदृष्टीनें आणि मर्यादेच्या दृष्टीनें तीन्ही दृष्टीनें तो उत्तम आहे म्हणून त्याला सर्वोत्तम म्हटलें आहे. महिमा म्हणजे ऐश्वर्य. क्षराक्षरत्व म्हणजे जीव —जगत्—तत्त्व. आणि मर्यादा म्हणजे धर्मनीति. ह्या सर्वांत तो उत्तम आहे.— 'उत्—तम' —अतिशय उंच — अतिशय श्रेष्ठ आहे म्हणून सर्वोत्तम संज्ञा केली आहे.

तो सर्वांत उत्तम आहे
त्याचें सर्व उत्तम आहे
सर्वांशीं तो उत्तम आहे
सर्वांना तो उत्तम आहे.

असें हे त्याचें चतुर्भुज सर्वोत्तम रूप आहे. सर्वोत्तम शब्दांतली ही खुबी आहे. अशी जरी खुबी असली तरी समर्थांना हा शब्द मर्यादापुरुषोत्तम राम, ह्या कल्पनेनें च मुख्यत: सुचलेला आहे, हें उघड आहे. करण ह्या धन्य अवस्थेच्या वर्णनानंतर लगे च

**जगीं होइजे धन्य या रामनामें** ५७

असें ते म्हणतात. म्हणजे ह्या "धन्य दशकाचा" उपसंहार करतांना, अकराव्या श्लोकांत सर्वोत्तम म्हणजे मर्यादापुरुषोत्तम राम असें च ते सुचविताता.

गीतेनें स्थितप्रज्ञ, धम्मपदांत ब्राह्मण, नरसीमेहत्यानें वैष्णव असे आदर्श मांडलेले आहेत. आदर्श पुरुष किंवा पूर्णपुरुष मांडण्याची प्रत्येक थोर विचारकाची पद्धति च दिसते. निट्शेनें सुद्धां Super man म्हणून आपली कल्पना मांडली च आहे. समर्थांनी हि दहा श्लोकांत आपला आदर्श पुरुष खडा केला आहे.

हे दहा श्लोक वाचतांना समर्थांचें च स्वतःचें हें वर्णन आहे; असें प्रत्ययाला आल्याखेरीज रहात नाही. समर्थ जरी खरोखर च समर्थ पदवीला पोंचले होते, तरी स्वतःला ते दास म्हणवीत.

**म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी** २०५

इत्यादि चरणावरून हि ही गोष्ट लक्षांत येते. येथे हि

**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा**

असा पालुपदादाखल चरण घातला गेला आहे. त्यांतील दास शब्द स्वाभाविकपणें च त्यांना स्वतःला हि लागू होतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाय

**सदा सेवि आरण्य तारुण्यकाळी** ५४
**उदासीन जो तापसी ब्रह्मचारी** ५०
**स्नेहाळू कृपाळू जगीं दासपाळू** ५६

इत्यादि चरणांवरून त्यांचें ह्यांत अगदीं स्पष्ट दर्शन होतें असें म्हणण्यांत काल्पनिकतेचा दोष मुळीं च येणार नाहीं असें वाटतें. पू. नानासाहेब देवांनीं हि टीपेंत ह्या गोष्टीला उचलून धरलें आहे.

**क्रमी वेळ जो तत्वचिंतानुवादें** ५२

हा हि चरण पहा. ह्यांत हि त्यांची च तत्त्वचिंतक मूर्ति पुढें दिसते. आणि असें होणें हें कांहीं अस्वाभाविक आहे असें नाहीं. कोणत्या

हि पुरुषाच्या उत्कृष्ट कृतींत त्याचें स्वतःचें प्रतिबिंब पडल्याशिवाय रहात नाहीं. दृष्टांतांत, उपमेंत, वर्णनांत, मांडणींत, कोठें ना कोठें त्याचें चित्र डोकवावयाचें च ! तें लपू च शकत नाहीं. योग्याचें वर्णन करतांना

**तैसी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां**
**बाळपणीं च सर्वज्ञता । वरी तयातें** (गी. अ. ६ ज्ञाने. ओवी ४५२)

ज्ञानेश्वरांनीं केलेलें हें वर्णन, त्यांच्या स्वतःचें च चित्र दाखवीत नाहीं काय ? "रजो रागात्मकं विद्धि" ( गी. १४/७ ) ह्यावर भाष्य करतांना शंकराचार्य म्हणतात " रजो रागात्मकं–रञ्जनात् रागो **गैरिकादिवत्** रागात्मकं विद्धि–जानीहि " रजोगुण हा रागात्मक आहे हें सांगतांना, त्यांना दृष्टांत ' गैरिकादिवत् ' हा आढळण्याचें कारण काय ? स्वाभाविक च संन्यासी असल्यामुळें, स्वतःच्या वस्त्रांचा गैरिक रंग पुढें च होता.–तो च दृष्टांतादाखल त्यांनीं घेतला. चित्रकार चित्रें काढीत असतांना तर हा अनुभव नेहमी येतो. तो चित्र काढतो रामाचें, कृष्णाचें, शंकराचें; परंतु त्यांत आंगलट उमटते स्वतःची ! चित्रकार जर किडकिडीत असला, तर त्यानें मुद्दाम जरी चित्रें लठ्ठ काढलीं, तरी त्यांत सडपातळ झांक मारते च ! प्रकृत मुद्दा इतका च कीं, स्वाभाविकता, अन्य सत्पुरुषांचे दाखले, खुद्द ह्या श्लोकांतील चरणांचे पुरावे या सर्वांवरून हें वर्णन खुद्द समर्थांचें च आहे, ह्या म्हणण्याला कांहीं च प्रत्यवाय दिसत नाहीं.

ह्या दहा श्लोकांत पूर्वीं सांगितलेला उपदेश थोडक्यांत समावून टाकण्याची हि दृष्टि दिसते. पूर्वीं ज्या उपदेशात्मक गोष्टी सांगितल्या, मनाला जो बोध दिला, तो सर्व ह्या आदर्शांत

समाविष्ट आहे, हें दाखविणें क्रमप्राप्त च मानावें लागतें. ह्यासंबंधीं कांहीं उतारे पाहिल्यानें, पूर्वोपदेशसमावेशनाची यांतली दृष्टि तेव्हां च लक्षांत येईल. अधिक विस्ताराची आवश्यकता नाहीं.

( १ )

गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा १
[ सगूणी भजे... ... ... ४९ ]

( २ )

पुढे वैखरीं राम आधीं वदावा ३
न बोले मना राघवेवीण कांहीं २३
रघूनायकावीण बोलो नको हो ४३
[ सदा रामनामें वदे नित्य वाचा ४८ ]

( ३ )

मना धर्मता नीति सोडूं नको हो ४
[ स्वधर्में चि चाले सदा ... ... ४८ ]

( ४ )

मना चंदनाचे परी तां झिजावें ८
[ सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा ४८ ]

( ५ )

नको रे मना काम नाना विकारी ६
[ नसे अंतरीं कामकारी विकारी ५० ]

( ६ )

नको रे मना द्रव्य तें पूढिलांचें ९
[ सांडिला स्वार्थबुधी ५१ ]

( ७ )

नको रे मदा सर्वदा अंगिकारू ६

[ मदें ... ... सांडिला ५१ ]

( ८ )

नको रे मना मछरू ... ... ६

[ मछरें सांडिला ... ... ५१ ]

( ९ )

नको रे मना दंभ भारु ६

[ न लिपे कदा दंभ वादें ... ५२ ]

( १० )

स्वयें सर्वदा नम्र वाचें वदावें ७

[ सदा बोलणें नम्र वाचा ... ५१ ]

( ११ )

मना सर्वथा सत्य सांडूं नको रे

मना सर्वथा मिथ्य मांडूं नको रे १९

[ सदा सर्वदा सत्यवादी

न बोले कदा मिथ्य वाचा ५३ ]

( १२ )

नको रे मना क्रोध हा खेदकारी ६

[ तया अंतरीं क्रोध संताप कैंचा ५६ ]

( १३ )

सुखालागि आरण्य सेवीत जावें ४४ ]

[ सदा सेवि आरण्य तारुण्य काळीं ५४ ]

इ. इ. इ.

ज्याप्रमाणें ह्या वर्णनांत पूर्वोपदेश समाविष्ट केला आहे, तसें पुढील उपदेशाचें सूचन हि केलें आहे. त्याचें हि विवेचन न करतां फक्त दोन उतारे देऊं. त्या उताऱ्यावरून लक्ष्यांत येईल कीं ज्ञानपर भाग सोडला तर मागें न आलेला पुढील महत्त्वाचा भाग एवढाच आहे [ (१) बोलण्यासारखी क्रिया (२) वादो नावलंब्य: ]

( १ )

**[ सदा बोलण्यासारिखें चालताहे** ४९ **]**
**जनीं बोलण्यासारिखें चाल बापा** १०५
**जनीं बोलण्यासारिखें आचरावें** ११५
**क्रियेवीण वाचाळता ते निवारी** १०८
**क्रियेविण वाचाळता वेर्थ आहे** ११४
**मुखें बोलिल्यासारिखें चालताहे**
**मना सद्गुरू तो चि शोधूनि पाहे** १८२

( २ )

**[ न लिपे कदा दंभ वादें विवादें** ५२
**करी सूखसंवाद जो ऊगमाचा** ५२ **]**
**तुटे वाद संवाद तो हीतकारी** १०८ ते ११२
**तुटे वाद संवाद तेथें करावा** ११५ इ. इ.

ह्या दहा श्लोकांचें अवलोकन केलें तर त्यांत मुख्य पांच भागांत हें वर्णन विभागलेलें दिसतें. पहिल्या भागांत दासाची स्थिति (४७-४८-४९) दुसऱ्या भागांत दासाची निर्विकारता (५०–५१) तिसऱ्या भागांत दासाची लोकसेवा (५२–५३) चौथ्या भागांत दासाचा एकांत (५४) पांचव्या भागांत दासाचा लोकसंग्रह (५५–५६) असे मुख्य पांच भाग आहेत.

**दासाची स्थिति:—**

(१) अंतर्बाह्य श्रीहरीचें दर्शन ४७ चरण १

(२) तत्साधन ज्ञान ४७ चरण २

(३) ज्ञानसाधन भक्ति ४७ चरण २

(४) भक्तिसाधन सगुणप्रेम ४७ चरण ३

(५) सगुण प्रेमसाधन साधनक्रम ४७ चरण ३

(६) पूर्णनिर्दिष्ट साधनक्रम म्हणजे

(७) १ देवकार्यार्थं झिजणें ४८ चरण १

(८) २ रामनाम जप ४८ चरण २

(९) ३ स्वधर्ममग्नता ४८ चरण ३

= (नीति)

(१०) नीतीची मुख्य खूण :—बोलण्याप्रमाणें चालणें ४९ चरण १

(११) दासस्थितीचा उपसंहार—अनेकांत एकत्व म्हणजे च सर्वत्र श्रीहरी ( पहा ४७—चरण १ ) ४९ चरण २

(१२) दासस्थितीचा उपसंहार—सगुणप्रेम (पहा उपक्रम ४७ चरण ३ ) ४९ चरण ३

(१३) दासस्थितीचा उपसंहार—म्ह. ‘लेश नाहीं भ्रमाचा’ म्हणजे च उपक्रमांतील ज्ञान ( पहा उपक्रम ४७ चरण २) ४९ चरण ३

उपक्रमोपसंहारांत

(१) सर्वत्र भगवव्द्याप्ति (२) ज्ञान

(३) भक्ति (४) सगुणप्रेम

ह्या गोष्टी स्पष्टपणें आल्या आहेत. ही सगळी दासस्थिति निर्विकारतेशिवाय प्राप्त झालेली नाही. ह्या एकंदर स्थितीची साधना पुढील दोन श्लोकांत दाखवितात.

दासाची निर्विकारता:-

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | कामादिविकारशून्यता | ५० चरण १ |
| ( २ ) | तत्साधन उदासीनता | ५० चरण २ |
| ( ३ ) | उदासीनतेसाठीं तपस्या | ५० चरण २ |
| ( ४ ) | मिळून : ब्रह्मचर्य | ५० चरण २ |
| ( ५ ) | ब्रह्मचर्यार्थ शांति | ५० चरण ३ |
| ( ६ ) | शांतीसाठीं तमोविनाश | ५० चरण ३ |
| ( ७ ) | पूर्व श्लोकांतील कामाबरोबरचे विकार मदमत्सरादि. त्यांचे राहित्य | ५१ चरण १ |
| ( ८ ) | म्हणजे च एकंदर विकार प्रपंचोपाधींतून सुटका | ५१ चरण २ |
| ( ९ ) | या उपाधींतून सुटण्याचें साधन नम्रता | ५१ चरण ३ |

विकारांतून सुटण्यासाठीं श्लोक ७ मध्यें हें च साधन सांगितलें आहे व तेथें अशी च समान रचना आली आहे. व तत्पूर्वीच्या ६ व्या श्लोकांत ह्या श्लोकाप्रमाणें च मदमत्सरादींचा उल्लेख आहे; हे लक्षांत असावें.

ह्यानंतर लोकसेवा किंवा कीर्तनभक्ति:-

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | तत्त्वचिंतनाचा अनुवाद | ५२ चरण १ |
| ( २ ) | तो करीत असतां दंभ व वादराहित्य | ५२ चरण २ |
| ( ३ ) | सुखसंवाद | ५२ चरण ३ |
| ( ४ ) | लोकांशीं सरळपणा व प्रेम | ५३ चरण १ |

( ५ ) लोकांना सत्य सांगणें ५३ चरण २
( ६ ) असत्य न सांगणें ५३ चरण ३

ह्या दोन श्लोकांशीं म्हणजे कीर्तनद्वारां लोकसेवा ह्याशीं पूर्वींचे १८–१९ श्लोक ताडून पहावे १८ व्या श्लोकांत रामवर्णन म्हणजे त्याचा गुणानुवाद व १९ व्या श्लोकांत सत्यविवेचन मांडलें आहे. येथें ५२ व्या श्लोकांत तत्त्वचिंतनानुवाद व ५३ व्या श्लोकांत सत्यविवेचन आहे.

लोकांत दास कसा असतो हें दाखविल्यावर एकांतांतलें त्याचें वर्णन आलें आहे. दासाचा तारुण्यकाळ एकांतांत जातो. तारुण्यकाळ म्हणजे उमेदीचा काळ. आयुष्याचा तारुण्यकाळ आणि दररोजचा तारुण्यकाळ दोन्ही अर्थ गृहीत आहेत. रोजचा उमेदीचा सकाळचा वेळ एकांतांत घालवावयाचा हा त्याचा क्रम असतो. समर्थांनीं स्वतःचा सगळा तारुण्यकाळ आणि रोजचा सकाळचा वेळ एकांतांत अभ्यासदृढीकरणांत घालविला; हें प्रसिद्ध च आहे. 'प्रभाते मनीं ( ३ )' हा चरण पूर्वी आलेला आहे व ( ६७ ते ७६ ) पुढें यावयाचा आहे. ह्या चरणांत हि ही च तारुण्यकाळीं आरण्यवासाची कल्पना. प्रभातकाळीं रामचिंतनाच्या द्वारें मांडली आहे. त्या एकांतांत दास कल्पनेच्या जाळ्यांत सांपडत नाही. कल्पना, कामना, वासना ह्या एकमेकींच्या सहोदर बहिणी च आहेत. त्यांत फार फरक करावयास नको. आणखी चार श्लोक टाकले कीं ५८ व्या श्लोकांत एतत्संबंधीं उपदेश यावयाचा च आहे. १०८ व्या श्लोकांत पुन्हां जरा निराळ्या तऱ्हेनें हा उपदेश केलेला आहे. दास एकांतांत आपल्या निश्चयाचें दृढीकरण करतो. आपली निश्चल अवस्था वाढवितो. असा एकूण

ह्या श्लोकाचा भावार्थ आहे. शिवाय एकांतवास म्हणजे केवळ स्थूल अरण्य नव्हे, हें येथें स्पष्ट केलें आहे. कल्पनेच्या मेळांत पडला कीं अरण्य गेलें. अरण्यवास म्हणजे च कल्पनेंतून सुटणें. हा महत्त्वाचा अर्थ विचारणीय आहे. कल्पनेंतून सुटण्याला अरण्यवासाची कदाचित् मदत होईल. पण अरण्यवास केला म्हणजे कल्पनेंतून सुटला असें नव्हे. म्हणजे कल्पनाराहित्याला अरण्यवास साक्षात् कारण होऊं शकत नाहीं. स्थूल अरण्यवास हें अनुपान आहे. प्रत्यक्ष औषध नाहीं.

ह्यापुढें ५५-५६ श्लोकांत लोकसंग्रह दिसतो. लोकसंग्रहाची पहिली अट—

(१) दुराशा—नष्ट आशा सोडणें = निष्कामता.

(२) दुसरी अट—अंतःकरणांत ईश्वरविषयक प्रेमाची तहान.

(३) तिसरी अट—भक्तीची अत्युत्कटता. श्लोक ५५

त्यानंतर—

(१) दीनाविषयीं कळकळ—('दिनाचा दयाळू' हें विशेषण परमेश्वराला हि योजलें आहे (७४) तें च विशेषण दासाला हि योजलें आहे. कारण उघड आहे. तस्मिंस्तज्जनें भेदाभावात्। नारद भ. सू. ४१)

(२) मनाचें मार्दव

(३) लोकांविषयीं स्नेह

(४) दासपालन

(५) क्रोधराहित्य

हे गुण सांगितले आहेत. दासपाळू शब्दानें ते समर्थांचे मठ, त्यांच्या योजना, तो शिष्यसमुदाय इ. गोष्टी एकदम डोळ्यापुढें उभ्या

राहतात! येथें हें स्पष्ट करणें आवश्यक आहे कीं, लोकसेवा आणि लोकसंग्रह एक नव्हे. लोकसेवा करण्याचा प्रयत्न कोणी हि पामर यथाशक्ति करूं शकेल. पण लोकसंग्रह फक्त समर्थ पुरुष च करतील. लोकसेवा हें साधन आहे. लोकसंग्रह ही सिद्धि आहे. लोकसंग्रहाच्या सांगितलेल्या अटीवरून ही गोष्ट लक्षांत येईल. ४७-४८-४९ दासाची आंतरस्थिति सांगितली ५०-५१ दासाची निर्विकारता. ५२-५३ दासाची लोकसेवा. ५४ दासाचा एकांत. ५५-५६ दासाचा लोकसंग्रह. दहा श्लोकांचे पांच भाग पाडून हें सुंदर वर्णन प्रवाहधारेनें, प्रत्यक्ष अनुभवानें करण्यांत आलें आहे.

ह्या वर्णनांत आणखी एक मौज आहे. श्लो. ४७-४८-४९ ह्यांत बहुतेक वर्णन दास कशानें युक्त असतो अशा तऱ्हेनें केलें आहे. पुढील सात श्लोकांत सरमिसळीनें म्हणजे तो कोणत्या गुणांनीं युक्त, व कशानें रहित असतो, असें युक्तायुक्तयुक्त वर्णन केलें आहे. तसें च सबंध वर्णनांत

| | | | |
|---|---|---|---|
| १ सदा देवकाजीं | ४८ | ५ सदा आर्जवीं | ५३ |
| २ सदा रामनामें | ४८ | ६ सदा सर्वदा सत्य | ५३ |
| ३ सदा बोलण्यासारिखें | ४९ | ७ न बोले कदा | ५३ |
| ४ सदा बोलणें नम्र | ५१ | ८ सदा सेवि | ५४ |
| | | ९ मिळेना कदा | ५४ |

अशी दहा श्लोकांत नऊ वेळा सदा व कदा शब्दाची योजना करून दासाची तत्तद्विषयक निष्ठा व सातत्य ह्यांचें दर्शन करविलें आहे.

*

ह्या श्लोकांतील दासाच्या ठिकाणीं असलेल्या गुणांची मोजदाद केली तर साधारणपणें पुढील गुण आढळून येतील.

| | | | |
|---|---|---|---|
| १ अंतर्बाह्य ईश्वरदृष्टि | ४७ | १७ सगुणप्रीति | ४७, ४९ |
| २ अनेकांत एकत्व=अद्वैत | ४९ | १८ भक्ति | ४७, ५५ |
| ३ ज्ञान | ४७ | १९ देवासाठीं झिजणें | ४८ |
| ४ विवेक | ५३ | २० स्वधर्ममग्नता | ४८ |
| ५ तत्त्वचिंतन | ५२ | २१ साधनक्रमरक्षण | ४७ |
| ६ तत्त्वानुवाद | ५२ | २२ रामनामजप | ४८ |
| ७ उदासीनता | ५० | २३ स्नेहमयता | ५५, ५६ |
| ८ तपस्या | ५० | २४ मनाची मृदुता | ५६ |
| ९ एकांतसेवन | ५४ | २५ सर्वलोकप्रियता | ५३ |
| १० दृढनिश्चय | ५४ | २६ तमःशून्यता (सात्त्विकवृत्ति) | ५० |
| ११ सत्यवाणी | ५३ | | |
| १२ वादराहित्य | ५२ | २७ नम्रवाणी | ५१ |
| १३ अलिप्तता (षड्रिपूपासून) | | २८ सुखसंवाद | ५२ |
| | ५०, ५१, ५२, ५६ | २९ दासपालन | ५६ |
| १४ अचलता | ५४ | ३० दीनदयाळुता | ५६ |
| १५ बोलणें = भाषण | ४९ | ३१ तदनुरूप चालणें | ४९ |
| १६ शांति | ५० | ३२ कृपाळुता | ५६ |

'षोडषकलः पुरुषः' असें उपनिषदांत वचन आहे. (प्रश्नोपनिषत् षष्ठः प्रश्नः) येथें हा पुरुष ३२ कलांनीं युक्त आहे असें दिसून येतें. ह्या ३२ गुणांचें सूत्र '**जनीं जाणता भक्त** होऊनि राहे (४७)' हें आहे. 'तेषां ज्ञानी नित्ययुक्तो एकभक्तिर्विशिष्यते (गी. ७/१७)' हा गीतेंतला ज्ञानी भक्त च येथें गृहीत आहे. दास

हा 'ज्ञानी भक्त' आहे. त्यामुळें जरी भक्तिज्ञानांत अभेद असला, तरी कांहीं गुण ज्ञानाच्या अंगानें आणि कांहीं गुण भक्तीच्या अंगानें त्याच्या ठिकाणीं विराजमान झालेले आहेत. हे दोन्ही तऱ्हेचे गुण समोरासमोर च मांडले आहेत. त्यामुळें ज्ञानाच्या अंगानें आलेले गुण व भक्तीच्या अंगानें आलेले गुण ह्यांची तुलना तेथल्या तेथें च करतां येते.

ह्या गुणवर्णनाशीं साधर्म्य पाहूं लागल्यास त्याचा विस्तार वाटेल तेवढा करतां येईल. तो जरी सर्व सोडून दिला तरी अगदीं सहजगत्या सुद्धां कांहीं सदृश वचनें डोळ्यापुढें येतात. उदाहरणार्थ

| | | |
|---|---|---|
| १ मनीं लोचनीं श्रीहरी | ... | ईशावास्यमिदं (ई. १) |
| २ लेश नाहीं तमाचा | | गीतेंतील त्रिगुणातीत (गी. श्लो. १४/२१ ते २६ |
| ३ स्वधर्में चि चाले | ... | स्वधर्मे निधनं श्रेयः (गी. ३/३५) |
| ४ अनेकीं सदा | ... | सर्व भूतेषु येनैकं (गी. १८/२०) |
| ५ उदासीन | ... | उदासीनवदासीनो (गी. १४/२३) |
| ६ सदा सेवि आरण्य | ... | विविक्तदेशसेवित्वं (गी. १३/१०) |
| ७ जनीं जाणता भक्त | ... | तेषां ज्ञानी नित्य (गी. ७/१७) |
| ८ चळेना मनीं | ... | स्थिरमतिः (गी. १२/१९) |
| ९ क्रमी वेळ जो तत्त्वचिंतानुवादें | | अध्यात्मज्ञान (गी. १३/११) |

तसेंच स्थितप्रज्ञाच्या श्लोकांतील 'स्थितधीः किं प्रभाषेत ?' 'किं आसीत् ?' 'किं व्रजेत् ?' ह्या तीन प्रश्नांचीं रामदासी उत्तरें ह्यांत आढळतील.

( १ ) स्थितधीः किं प्रभाषेत् ?

उत्तरः—सदा बोलणें नम्र वाचा सुवाचा ५१

सदा सर्वदा सत्यवादी ५३

पहा गीतेचें उत्तरः—‘ नाभिनंदति न द्वेष्टि ’ (गी. २/५७)

( २ ) किं आसीत् ?

उत्तरः—नसे अंतरी कामकारी विकारी ५०

पहा गीतेचें उत्तरः—‘ युक्त आसीत मत्परः (गी. २/६१)

( ३ ) किं व्रजेत् ?

उत्तरः—बोलण्यासारिखे चालताहे ४९

पहा गीतेचें उत्तरः— ‘ पुमांश्चरति निस्पृहः’ (गी. २/७१)

परंतु ह्या सर्व समानतेच्या स्मारकांपेक्षां गीतेंतील

‘ अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्

दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ऱ्हीरचापलम् (गी. १६/२)’

ह्या श्लोक या वर्णनांत पुष्कळ प्रमाणांत प्रतिबिंबित झालेला दिसतो. ह्या श्लोकांतील अकरा गुणांपैकीं खालील ८ गुण दासाच्या ठिकाणीं दाखविले आहेत.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ शांति | ... | निवाला मनीं | ... | ५० |
| २ अक्रोध | ... | तया अंतरीं क्रोध | ... | ५६ |
| ३ सौजन्य | ... | सदा आर्जवी | ... | ५३ |
| ४ सत्य | ... | सदा सर्वदा सत्यवादी | ... | ५३ |
| ५ अलुब्धता | ... | नसे मानसीं | ... | ५५ |
| ६ दया भूतीं | ... | दिनाचा दयाळु | ... | ५६ |
| ७ स्थैर्य | ... | चळेना मनीं | ... | ५४ |
| ८ मार्दव | ... | मनाचा मवाळु | ... | ५६ |

ह्याशिवाय इतर ठिकाणच्या तुलनेपेक्षां ह्या ग्रंथांतील च (१३३, १३४) श्लोकांतील 'योगी' पुरुषाच्या वर्णनाशीं हें दासाचें वर्णन ताडून पाहतां येईल. योग्याचें वर्णन थोडक्यांत सहज म्हणून केलेलें असल्यामुळें तुलनेला योग्य अवसर रहात नाहीं ही गोष्ट उघड आहे. तथापि १ भक्ति २ ज्ञान ३ वैराग्य ४ निश्चय ५ गर्वराहित्य ६ क्षमा ७ शांति ८ दया ९ निर्लोभता १० अक्षोभता ११ अदीनता. इत्यादि गोष्टी योग्याच्या वर्णनांत आहेत त्या येथें हि दिसतील. शिवाय (१८० ते १८३) ह्या श्लोकांत केलेलें गुरुवर्णन हि तुलनेसाठीं बघतां येईल. विशेषत: त्या वर्णनांतील १८३ वा श्लोक, ह्या दासाच्या श्लोकांच्या तोडीचा अगदीं व्यवस्थित वठला आहे हें तेव्हां च लक्षांत येईल.

एकंदरीत ह्या गुणवर्णनाकडे पाहिलें तर स्थितिदर्शक वर्णन करण्यापेक्षां साधनदर्शक वर्णन करण्याकडे त्यांन जास्त कल आहे असें दिसून येतें. म्हणजे सिद्धाच्या अंतिम अवस्थेच्या वर्णनापेक्षां त्याच्या साधनेचें वर्णन अधिक येईल अशा तऱ्हेचें धोरण दिसतें. येणें प्रमाणें ह्या दहा श्लोकांत--

(१) धन्य पुरुषाचें म्हणजे च सर्वोत्तमाच्या दासाचें वर्णन आहे.

(२) सर्वोत्तम शब्दांत अनेक खुब्या असल्या तरी हा शब्द एकूण 'मर्यादापुरुषोत्तम' शब्दावरून सुचला असें दिसतें.

(३) ह्या आदर्शांत स्वत: समर्थांचें चित्र अपरिहार्यपणें गोवलें गेलें आहे.

(४) ह्यांत मनाच्या श्लोकांतील पूर्वोपदेश समावून टाकण्याची दृष्टि दिसते.

(५) तसें च पुढील उपदेशाची हि सूचना दिसते.

( ६ ) ह्या वर्णनाचे मुख्य पांच विभाग दिसतात.

( ७ ) युक्ततेनें आधीं व नंतर युक्तायुक्ततेनें वर्णन केलें आहे.

( ८ ) सदा शब्दाची सारखी अनुवृत्ति करून निष्ठा दाखविली आहे.

( ९ ) एकंदर वर्णनांत ३२ गुण दिसतात.

(१०) ते ज्ञान व भक्तीच्या अंगानें १६।१६ असे आलेले आहेत.

(११) ह्या वर्णनाशीं साधर्म्य पुष्कळ दाखवितां येईल.

(१२) तरी दैवी संपत्तीच्या दुसऱ्या श्लोकाशी हें वर्णन पुष्कळ जुळतें.

(१३) एकंदर साधनपर वर्णन करण्याचा कल दिसतो. असे हे १३ मुद्दे येथें विवेचिले. गीतेंतील आदर्शाशीं ह्या आदर्शाचें पुष्कळ साम्य असलें, तरी स्थितप्रज्ञ, योगी, संन्यासी, भक्त, त्रिगुणातीत–ह्या सर्वांच्या वर्णनांत आढळून येणारा साम्याचा किंवा समत्वाचा मुद्दा ह्या वर्णनांत मांडला गेला आहे असें वाटत नाहीं. कदाचित् इतर सर्व आदर्शवर्णनांत गीतेचें हें च वैशिष्टय असण्याचा संभव आहे.

धन्य पुरुषाचें वर्णन केल्यानंतर उपसंहाराचा ५७ वा श्लोक येतो. त्यांत रामनाम, भक्ति, सत्क्रिया, उपासना, उदासीनता म्ह. वैराग्य हीं थोडक्यांत धन्यतेचीं कारणें सांगितलीं आहेत. तद्वारा धन्य पुरुषाची मोकळी वृत्ति म्ह. जीवन्मुक्तावस्था

**सदा सर्वदा मोकळी वृत्ति राहे** ५७

ह्या चरणाच्या द्वारें दर्शविली आहे.

ज्या उपदेशापासून सुरवात करून मनाला बोध दिला व ज्याच्या योगानें मनुष्याला धन्य अवस्था प्राप्त करून घेतां येते; तो प्रथमारंभींचा उपदेश आतां पुन्हां दोन श्लोकांत (५८-५९) स्मरणादाखल आणला आहे. मनाची ठेवण किंवा श्रेणी जी श्लोक ४ व ५ मध्यें आरंभीं दाखविली ती च येथें किंचित् निराळ्या तऱ्हेनें आणली आहे. कल्पना, वासना, कामना असें थोडक्यांत तिचें स्वरूप मांडून, प्रथमारंभीं ज्याप्रमाणें तदनंतर विचार, लोकसेवा, सज्जनसेवा इ. साधनें दाखविलीं तशीं न दाखवितां तेथें शेवटीं सांगितलेलें रामचिंतन एकदम येथें दाखविलें आहे. आदि अंत दाखविल्यानें मधली साधना येऊन च जाते ही एक कल्पना आणि येथें निव्वळ स्मरण करवून द्यावयाचें आहे म्हणून असा संक्षेप केलेला आहे. शिवाय रामचिंतनांत सर्व च येऊन जात नाहीं काय ?– म्हणून च ६० व्या श्लोकांत रामाचा महिमा वर्णन करतांना कल्पतरू, कामधेनु, चिंतामणि असे तीन दाखले मुद्दाम दिले.

प्रथमारंभींची साधना व राममहिमा ५८, ५९, ६० ह्यामध्यें वर्णन करण्यांत एक हेतु आहे. ह्या साधनेनें च मनुष्याला धन्यत्व येतें हें जसें श्लोक ५७ पर्यंत दाखविलें, तसें आतां ही साधना न केल्यानें कशी दीनवाणी स्थिति होते हें दाखवावयाचें आहे. त्याप्रमाणें ६१–६२–६३–६४ ह्या चार श्लोकांत ह्या दीनवाण्या भक्तिशून्य विषयी पुरुषाचें वर्णन केलें आहे. ही दीनवाणी स्थिति येण्याला सर्वस्वीं जबाबदार आपण च आहों, हें दाखविण्यासाठीं श्लोक ६० मधील राममहिम्याचे दृष्टांत मुद्दाम ६१–६३ मध्यें उपयोगांत आणले आहेत. धन्य पुरुषाच्या विरुद्ध दीन पुरुष, अशीं दोन चित्रें उभीं केल्यामुळें, तुलनेला सहज च विषय मिळाला

आहे. खालील उदाहरणांवरून दोहोंमधील अंतर एकदम लक्षांत येईल.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (१) | धन्य पुरुष सर्वत्र हरिदर्शन करतो. | ४७ | हा कल्पवृक्षातळी असून दुःख करतो | ६१ |
| | | | ह्याच्या चित्तांत राम नाही | ६४ |
| (२) | तो वादापासून अलिप्त. | ५२ | हा वाद वाढवतो | ६३ |
| (३) | तो दृढनिश्चयी | ५८ | याला दृढबुद्धी नाही | ६४ |
| (४) | त्याला स्वार्थबुद्धी नाहीं. | ५१ | याला अति लोभ | ६४ |
| (५) | तो निर्विकार | ५० | हा अतिविषयी | ६४ |
| (६) | त्याच्या ठिकाणी तम नाही. | ५० | हा अतिशय मूढ | ६८ |
| (७) | तो तत्त्वचिंतनांत मग्न | ५२ | ह्याला निदिध्यसन नाही | ६२ |
| (८) | तो अभेददृष्टीचा | ४९ | ह्याची भेददृष्टि | ६२ |

वरील तुलनेनें थोडक्यांत ह्या दीन पुरुषाची स्थिति सहज लक्षांत येईल. आरंभोपदेशस्मरण व दीनपुरुष वर्णन ६० व्या श्लोकाने जोडली गेली आहेत, म्हणून दोन्ही प्रकरणांचा ६५ व्या श्लोकांत एकत्र उपसंहार केला आहे. दीनपुरुषवर्णनाचा उपसंहार

**नको दैन्यवाणें जिणें भक्तिऊणें**
**अती मूर्ख त्या सर्वदा दुःख दूणें** ६५ पूर्वार्ध

प्रारंभोपदेशस्मरणाचा उपसंहार

**धरीं रे मना आदरें प्रीति रामीं**
**नको वासना हेमधामीं विरामीं** ६५ उत्तरार्ध
**नको रे मना द्रव्य तें पूढिलांचें** ९

व लगेच

**सदा सर्वदा प्रीति रामीं धरावी** १०

ह्या पूर्वींचा उपसंहार हि अगदीं तंतोतंत असा च आहे. हेम, धाम आणि विराम म्हणजे द्रव्य, धाम म्ह. घर व स्त्री, आणि विराम म्हणजे आराम किंवा विश्राम, अथवा सुख. ह्या अर्थ सांगण्याचें येथें प्रयोजन इतकें च कीं 'विरामीं' म्हणजे काय? ह्याबद्दल शंका उपस्थित झाली आहे. (पहा दुसरा सुमनहार पृ. ६)

असा हा संसार वासनायुक्त, रामभक्तिशून्य, दीनतेनें भरलेला आहे. ह्यांत सत्य शोधून पहावें, ह्या संसारविषाला सोडून राघवाचें ध्यान करावें. अशी 'प्रभाते मनीं' ह्या दशकाची आतां प्रस्तावना करतात (६६) श्रीरामाचें आश्वासन मिळविण्या-पूर्वीं हि 'भवाच्या' म्हणजे संसाराच्या भयानकतेचा असा च उल्लेख केलेला आहे. (२७) व श्लोक २६ मध्यें 'करी रे मना भक्ति या राघवाची' असें म्हटलेलें आहे. येथें संसाराच्या भयानकतेचा उल्लेख करून

**करीं रे मना ध्यान या राघवाचें**

असें म्हटलें आहे. बाकी दोन्ही स्थळें हुबेहुब सारखी च आहेत. संसारापासून सुटण्यास तेथें दहा श्लोकांत रामाचें आश्वासन काय आहे तें दाखविलें. येथें रामाचें ध्यान करण्यास सांगतात. दोहोंचा अर्थ जवळ जवळ एक च आहे. शिवाय 'भवाच्या भयें काय भीतोस लंडी' (२७) ह्या चरणाप्रमाणें च 'प्रभाते मनीं राम चिंतीत जावा' ह्या दशकाच्या समाप्तीनंतर दोन श्लोक टाकून "सोडि चिंता भावाची" असें स्पष्ट म्हटलें आहे. हें सादृश्य हि विचारांत घेतां, दोन्ही ठिकाणीं संसारचिंता सोडून आणि सोडण्यासाठीं रामाचें आश्वासन व ध्यान करण्याची समान प्रस्तावना केली आहे हें स्पष्टपणें नजरेंत भरतें.

प्रभातकाळ म्हणजे उमेदीचा काळ. प्रत्येक दिवसांतला उमेदीचा काळ, आणि आयुष्याचा उमेदीचा काळ म्ह. तारुण्य काळ. म्हणजे च प्रभातकाळ. असा प्रभातकाळाचा विशाल अर्थ आहे. उपनिषदांत याला च प्रातःसवन म्हटलें आहे. हा प्रभातकाळ सर्वांचा रामचिंतनांत जावा. तेणेकरून दिवसाची आणि आयुष्याची भूमिका पक्क्या पायावर उभी रहावी. असा रामचिंतनांत समर्थांचा हेतु आहे. "कौमार आचरेत् प्राज्ञो धर्मान् भागवतानिह" प्रह्लादानें भागवतांत ही च आज्ञा दिली आहे. स्वतः समर्थांनीं तिचें अक्षरशः परिपालन केलें. म्हणून अगदीं सुरवातीला च श्लोक ३ उपक्रमांत सांगून, आतां ससारविनाशार्थ त्याची पुनरावृत्ति केली आहे.

**महाघोर संसारशत्रु जिणावा** ७२

हा ह्या चिंतनाचा हेतु आहे.

(१) रामस्वरूप

(२) दोषशुद्धि

(३) नामजप

असें हें तिहेरी चिंतन आहे. ६७, ६८, ६९ मध्यें रामस्वरूपवर्णन आहे. त्यांत लावण्य, गांभीर्य, सामर्थ्य (६७) कालभयनिवारकता (६८, ६९) आनंदप्रदता (६९) असे विषय आहेत. दोषशुद्धीत– अनाचार, हेवा (६९) मद आलस्य (७०) यांचा त्याग सांगितला आहे. नामजपाचें माहात्म्य सांगताना आपदा आणि दोषविनाश (७०-७१) सद्गति आणि पुण्यप्राप्ति (७१) हे विषय आलेले आहेत. ७२–७३–७४ मध्यें नामसौलभ्य सांगितलें आहे. हें नामसौलभ्य पुढील नामप्रकरणांत हि आलेलें आहे.

**स्वल्प सोपें फुकाचे** ८८
**न वेचे मुखीं सांपडे रे फुकाचा** ९१
**तयाचें मुखीं नाम घेतां फुकाचें** ९३
**फुकाचें मुखीं नाम तें हि वसेना** १००

वरील उताऱ्यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. शेवटीं ७५-७६ श्लोकांत रामावर विश्वास ठेवण्याचा आग्रह केला आहे. साधारण आग्रह नव्हे.

**म्हणे दास विश्वास नामीं धरावा** ७६

असा स्वतःचें नांव घेऊन अनुभवपूर्वक आग्रह केला आहे. ह्यापुढें शंभर श्लोकापर्यंत नामविषय परोपरीनें सांगितला आहे. शंभराव्या श्लोकांत

**नव्हे कर्म ना धर्म ना योग कांही**
**नव्हे भोग ना त्याग ना सांग पाहीं** ७६

अशी च

**येथासांग रे कर्म तें हि घडेना**
**घडे धर्म तों पुण्य गांठी पडेना** १००

रचना आली आहे.

(१) रामाचें काम-(रामचरित्रांतील कामगिरी जी मागें श्लोक २८ ते ३३ मध्यें आहे.)

(२) रामाचें स्वरूप-(जे श्लोक ६७ मध्यें वर्णन केलें आहे)

(३) रामाचें गुण-( जे श्लोक ६७, ६८, ६९, मध्यें सांगितले )-त्यांचें चिंतन, जप किंवा ह्या श्लोकांतील शब्द कीर्तन- ह्या सर्वांचा परिणाम म्हणजे च निष्कामता, सरूपता, निर्द्वंद्वताप्राप्ति (७७) ह्यावरील अविश्वासानें हानि, विश्वासानें

इष्टसाध्य (७८) म्हणून संसारचिंता सोडून, रामभावनोपदेश व त्याची सार्थता (७९) रामचिंतनाच्या दशकाचा ह्या तीन श्लोकांत असा उपसंहार केला आहे.

'नसे वस्तुची धारणा वेर्थ गेली–७९' अंत्य चरण–रामचिंतनाची धारणा आजपर्यंत व्यर्थ गेलेली नाहीं.

चिंतनाचा ७७ व्या श्लोकांतील परिणाम अगदीं अचूक लाभलेला आहे. समर्थ स्वानुभवानें हें येथें सांगत आहेत.

श्लोक ८० हा एक प्रकारें कूट समजला जातो.

**धरा श्रीवरा त्या हरा अंतरातें** ८०

**मनः सं श्रय श्रीशमुत्सृज्य भेदं**

हरा अंतरातें = उत्सृज्य भेदं = अंतर तोडून –अंतर नाहींसें करून –( संस्कृत भाषांतरकार )

'हरा-अंतरातें' = शंकरहृदयाला. (नानासा. देव)

–ह्या चरणाचे असे दोन अर्थ केले जातात. नानासाहेबांच्या अर्थाला, पुढें नाममाहात्म्यांत, शंकराचा वारंवार उल्लेख आल्यामुळें, आधार आहे. एकंदरींत हा अर्थ करणें औचित्याला धरून दिसतें.

**सरा वीसरा त्या भरा दुर्भरातें** ८० तृतीय चरण

**महेयस्त्वया दुर्भरः काम एषः** (संस्कृत भाषांतरकार)

दुर्भर = पोट ( नानासा. देव )

दुर्भर = पोट ह्या नानासाहेबांच्या अर्थापेक्षां संस्कृत भाषांतरकाराचा अर्थ ज्यास्त सरस दिसतो.

**कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च**

ह्या गीतावचनाकडे नजर देऊन संस्कृतभाषांतरकारांनीं अर्थ केलेला

दिसतो. शेंवटच्या चरणांत मन्मथाचा उल्लेख आहे. येथें कामाचा उल्लेख केला आहे. काम हा पहिला व मत्सर हा शेंवटचा रिपु. दोघांचा उल्लेख केला म्हणजे मधले सगळे आले च, अशी कल्पना येथें बसते. दुर्भर हें पोटाचें विशेषण मानल्यानें ह्या रचनेला बाध येतो. ह्या चरणाचा अन्वयार्थ:—सरा = बाजूला व्हा. वीसरा = विसरून जा. व शेंवटीं, त्या दुर्भरातें भरा = त्या दुर्भर कामाला नमवा. भर ( परिनम ) = नमविणें. भर शब्दाची ही व्युत्पत्ति राजवाडे मान्य करतात (रा. धातुकोश पृष्ठ २१०) ह्या व्युत्पत्तीच्या आधारें केलेल्या अर्थाप्रमाणें भाषेंत किंवा रामदासांच्या भाषेंत आधार दाखवावयास पाहिजे. विचारसरणीच्या दृष्टीनें, कामाशीं पहिल्यानें झुंज न घेता, बाजूला सरणें, त्याला विसरणें व शेंवटीं आपली तयारी झाली म्हणजे त्याला नमविणें ह्यामध्यें दोष दाखवितां येणार नाहीं. शेंवटच्या चरणांतील 'नीकरा करा' ह्याचा अर्थ निकृंतन करा = छाटा. वर्ण्य वस्तूंचा श्रीवर व मत्सर असा प्रथम व अंतिम चरणांत स्पष्ट उल्लेख केला, तसा मधल्या दोन चरणांत न केल्यानें, निरनिराळ्या अर्थांना वाव मिळाला आहे, हें येथें आढळून येईल. असो, हा श्लोक येथें च सोडून देऊं. त्याच्याशिवाय संदर्भांत अडचण येईल असें दिसत नाहीं.

ह्यापुढें ८१ ते १०१ नाममाहात्म्य सांगितलेलें आहे. त्यांत शंकराचा सात वेळा उल्लेख आला आहे. (८२, ८३, ८४, ८५, ९२, ९४, ९९,) नामजपाचें माहात्म्य शंकराच्या उदाहरणानें ठसविण्याचा हेतु आहे.

**बहु ज्ञान वैराग्य सामर्थ्य** ८३

ही जी शंकरांच्या आंगची सहजस्थिति ती च मनाच्या श्लोकाचें फलित आहे.

**चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगीं**
**म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी** २०५

ह्या नाममाहात्म्यांत शंकराची आदर्शमूर्ति उभी करण्याचें कारण हें च. मारुती (८७) अजामिल (९५) कुंटीण (९६) प्रह्लाद (९६) ह्यांचा उदाहरणादाखल उपयोग केलेला आहे. व्यासांचा उल्लेख आधार देण्यासाठीं आहे (९०) आदर्श म्हणून शंकर, उदाहरण म्हणून हनुमंतादि, आधार म्हणून व्यास अशी नाम-माहात्म्यांतील व्यक्तियोजना दिसते. श्लोक ८१ मध्यें

**मना मछरें नाम सोडूं नको हो** ८१

हा चरण प्रथम आला आहे. त्यांतील 'मछर' शब्द मागील श्लोकांतील असल्यामुळें, हा नव्या विषयाला सुरवातीचा दुवा तर झाला च आहे, परंतु त्यांत हेतु फार निराळा आहे.

येत्वेतदभ्यसूयंतो (गी. ३/३२)
प्रद्विषन्तोऽभ्यसूयका. (गी. १६/१८)
न च मां योऽभ्यसूयति (गी. १८/६७)

गीतेंतील ह्या तीन उल्लेखावरून मत्सरपरंपरेचा इतिहास खरा च प्राचीन आहे असें दिसतें ! आसुरी संपत्तीचा जो जो अभिमानी असतो, तो तो स्वभावत: च परमेश्वर व त्याचें नांव ह्यांचा मत्सर करतो.

**जनीं दैत्य तो नाम मूर्खें म्हणेना** ९६

तेव्हां 'मना मछरें नाम सांडूं नको हो' हें म्हणण्यांत आसुरी वृत्ति सोड, दैवी वृत्ति धर हें सुचविण्याचा हेतु आहे. शंकराचा वारंवार दाखला देण्याच्या कारणांत हें हि एक कारण आहे. दैवी वृत्तीचा तो देव. आणि शंकर तर देवाचे देव = महादेव.

दैवी वृत्तीचा असेल तो च नाम घेतो. शंकर महादेव असल्याकारणानें ते अतिशयतेनें नाम जपतात. म्हणून त्यांचें ह्या प्रकरणीं महत्त्व विशेष. श्लोक ८१ मधील शेंवटच्या तीन चरणांची–श्लोकांची (८२, ८३, ८४) ही उदाहरणें आहेत.

(१) अत्यादरानें नाम घेणें
(२) नामध्यास ठेवणें
(३) नाम सर्व साधनांत सार मानणें
(४) नाम सर्वोपायश्रेष्ठ समजणें.

हे चार मुद्दे श्लोक ८१ मधील तीन चरणांत आले आहेत. श्लोक ८२ मध्यें सर्वोपायश्रेष्ठ मानून शंकरांनीं विषासाठीं नाम घेतल्याचें उदाहरण व तेथें च आदरानें नाम जपण्याचें उदाहरण व श्लोक ८४ मध्ये नामध्यास घेतल्याचें उदाहरण अशी सुंदर मांडणी आहे.

जी गोष्ट उदाहरणानें ८२–८३–८४ मध्यें सांगितली ती च उलट क्रमांत परिणामानें ८५–८६–८७–८८ ह्या चार श्लोकांत सांगतात.

(१) ध्यास किंवा ध्यानाचा परिणाम–शांति ८४, ८५, ८६
(२) सार म्हणजे ज्ञान, वैराग्य, सामर्थ्य.

| | |
|---|---|
| ज्ञानाचा परिणाम–आनंद<br>निःसंदेहता<br>निःशंकता | ८६ |

**वैराग्याचा परिणाम — निःष्कामता ८७**

**सामर्थ्याचा परिणाम — कैवल्य ८८**

समर्थता म्हणजे सर्व प्रतिस्पर्धी नष्ट करून विजयी स्वरूपानें एकटे च उरणें.

( ३ ) सर्वोपायश्रेष्ठतेचा परिणाम – भवरोगविनाश ८८

'करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें' ह्यांत हा भवरोगविनाश सांगितला आहे. पण त्याचा नीट अर्थ कोणीं केला नाहीं. (नामरूपी) मूळ = ( औषधाचें मूळ ) घेतां भवाचें निर्मूळ करी. नामरूप औषधानें भव म्हणजे संसार पूर्ण निर्मूळ होतो. मागें

**विषा औषध घेतलें पार्वतीशें** ८२

ह्या श्लोकांत हि सर्वोपायश्रेष्ठता औषधाच्या दृष्टांतानें दाखविली आहे. हें येथें आधारासाठी लक्षांत ठेवलें पाहिजे. समर्थांची ही एक सांगण्याची धाटणी च दिसते. उदाहरणार्थ **मुळानें निर्मूलन** होतें हें जसें येथें सांगितलें, तसें च जरा पुढें ९२ व्या श्लोकांत **घोषानें दोष** नाहींसे होतात हें सांगितलें आहे. मूळ म्हणजे औषधाचें मूळ हा अर्थ करण्याला हा हि एक आधार मिळतो. ह्याशिवाय 'जिवा सोडवी राम हा अंतकाळीं' ८४ व 'तुम्हा सोडवी राम हा अंतकाळीं ८५' ह्या चरणांत अंतकालमोचकता. श्लो. ८८ मध्यें नामसौंदर्य व सौलभ्य हे मुद्दे हि आले आहेत.

(श्लोक. ८९ ते ९३) हें प्रकरण अन्न व तत्संबंधीं उद्योगाशीं नामसंबंध तद्द्वारा दोषनाश व श्रीहरीची प्राप्ति एत्संबंधीं आहे. श्लो. ८९ मध्यें उपक्रम केला आहे. अन्नोपभोग व अन्नप्राप्तीच्या उद्योगांत नामासंबंधींचा विधि सांगितला आहे. उपसंहारांत (९३) अन्नाशीं देवाचा संबंध दर्शविला आहे.

'**जनीं भोजनीं नाम वाचे वदावें** ८९' प्रथम चरण ह्यांतील **भोजनीं शब्दाचा अर्थ भोजनविषयक उद्योग** असा केला पाहिजे. कारण पुढें

**हरीचिंतनें अन्न जेवीत जावें**

हें आलें च आहे. तेव्हां येथें लोकांत भोजनविषयक उद्योग करीत असतां नाम घेत जावें हें सांगण्याचा हेतु दिसतो.

**चालतां बोलतां धंदा करतां**

हें नानासाहेब देवांनीं उध्दृत केलेलें वचन येथें बरोबर लागू पडतें. चरितार्थसाधन आणि अन्नोपभोग ह्यांत अंतर्ग्राह्य नामजप होईल तर

**तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें**

हें फलित सहज च पुढें येऊन उभें राहील ! ( हा चरण श्लोक २ मध्यें हि आला आहे )

हें नाम घ्यावयाचें त्याचे प्रकार तीन (१) आदरपूर्वक, (२) गद्य = स्पष्ट ( गद् व्यक्तायां वाचि), (३) घोषपूर्वक. म्हणजे सद्वृत्ति, सौंदर्य, तन्मयता किंवा 'सत्यं शिवं सुंदरं' ह्या धोरणानें नाम घ्यावयाचें.

अती आदरें ह्याचा अनुवाद ९१, ९२ व १०२ मध्यें आहे.

घोषाचा दोषनाश हा परिणाम ९२ मध्यें दाखविला आहे. ९० वा श्लोक हा ह्या सर्व विवेचनाला आधारभूत आहे. त्यांतील व्यासवाणी म्हणजे पुढील श्लोक समर्थांच्या मनापुढें असावा असें दिसतें.

**केचिद्वदन्ति धनहीनजनो जघन्यः**
**केचिद्वदन्ति गुणहीनजनो जघन्यः**
**व्यासो वदत्यखिलवेदपुराणविज्ञो**
**नारायणस्मरणहीनजनो जघन्यः**

जघन्य शब्द नीचत्व, कनिष्ठत्व दाखवितो. श्लोक ९० मधील काणी शब्दांत तो च भाव आहे. काणी [ कनीयस् ] धन म्हणजे पर्यायानें अन्न होय. गुणाचा उल्लेख श्लोक ९२ मधील दोषांवरून लक्षांत येईल. नित्यव्यवसाय, अन्न, गुण ह्यांच्याशीं नामाचा काय संबंध आहे हें ८९ ते ९३ पर्यंत दाखविलें आहे.

९४–१०१ मुख्यत: नामाचें सामर्थ्य उदाहरणांसह दाखविलें आहे.

( ९४ ) कोपादिविकारशामकत्व

( ९५ ) पापादिदोषोद्धरणत्व

( ९६ ) सर्वव्यापकत्व (दैत्यकुळांत हि नामभक्त)

९७ ते १०० पर्यंत नामहीनतेनें दुर्दशा दाखविली आहे.

( ९८ ) जडमूढादितारकत्व

( ९९ ) काश्यादि तीर्थांतील नाममहत्त्व

(१०१) उपसंहार

नाममाहात्म्याचे एकूण तीन भाग पडतात.

(१) ८१ ते ८८ नामाचा आध्यात्मद्वारा परिणाम

(२) ८९ ते ९३ नामाचा आधिभूतद्वारा परिणाम

(३) ९४ ते १०१ नामाचा पारलौकिक परिणाम

श्लोक १०२ ते १०७ सत्क्रियेचा उपदेश केला आहे. हा सर्व उपदेश प्रथमारंभीं च बहुतेक येऊन गेला आहे. मागील श्लोकांचे आंकडे त्या त्या मुद्यावर दिले आहेत; त्यावरून ही गोष्ट लक्षांत येईल.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (१) **नम्रता** | १०२ | ... | ... | ७ |
| (२) **सज्जनसेवा** | १०२ | ... | ... | ८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ( ३ ) सगुण भजन | १०२ | .... .... | ४९ |
| ( ४ ) कीर्तन | १०३ | | |
| ( ५ ) निरूपण | १०३ | .... .... | ५२ |
| ( ६ ) कामिनीकांचनत्याग | १०३ | .... | ९ व २ |
| ( ७ ) बोलण्याप्रमाणें वागणें = सत्य | १०५ | | ४९ |
| ( ८ ) कल्पनात्याग | १०४, १०५ | .... | ५ |
| ( ९ ) उपासनाः–संध्यादि एकाग्रता | १०६ | | |
| (१०) दया–प्रेम | १०६ | | |
| (११) क्रोधराहित्य | १०७ | .... .... | ७ |
| (१२) दुःसंगत्याग | १०७ | | |

ह्या सत्क्रियेवर समर्थांचा मोठा कटाक्ष आहे. नाममाहात्म्याची एकादशी झाल्यानंतर ही सत्क्रियाद्वादशी आलेली आहे !

**विवेकें क्रिया आपुली पालटावी** १०५
**क्रियापालटे भक्तिभावार्थ लागे** १०८
**क्रियापालटे भक्तिपंथें चि जावें** ११५

ह्या चरणांरून ही गोष्ट लक्षांत येईल.

ह्यापुढें १०८ ते ११५ वादाची अनिष्टता आणि संवादाचे श्रेयस्करत्व दाखविलें आहे. वादाचीं व संवादाचीं लक्षणें त्यांत सांगितलीं आहेत. भक्तिसूत्रांतील 'वादो नावलंब्यः (ना.भ.सू.७४) बाहुल्यावकाशात् (७५) अनियतत्वाच्च (७५) हीं तीन सूत्रें हि यांत महज च येऊन गेलीं आहेत. वादसंवादाचीं सामान्यतः पुढील लक्षणें दिसून येतील.

| संवादलक्षण | | | वादलक्षण | |
|---|---|---|---|---|
| १ | क्रियेप्रमाणें वाचा | १०८ | १ अहंकार ११०, ११३, ११४, ११५ | |
| २ | शोकसंतापनाश | १०९ | २ वादानें अनिर्णय | ११२ |
| ३ | वादविनाश | ११० | ३ दंभ | ११२ |
| ४ | हितकारकता | १११ | ४ पांडित्यप्रदर्शन | ११३ |
| | | | ५ संशयवर्धन | ११२ |
| | | | ६ नानाविकारवर्धन | ११० |

'तुटे वाद संवाद तो हीतकारी' हें १०८ ते ११२ पर्यंत एतद्विषयक पंचक आलें असून, पुढें हि ११५ पर्यंत तो च विषय आहे.

११६ ते १२५ पर्यंत 'नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी' हें पालुपद घालून, दशावताराचे व त्याशिवाय आणखी निराळे सहा, मिळून एकंदर सोळा दाखले दिले आहेत. ह्या उदाहरणांपैकीं अजामिळ, प्रह्लाद व राम हीं उदाहरणें पूर्वी आलेली आहेत; हें दिलेल्या आंकड्यांवरून लक्षांत येईल. प्रथम अवताराखेरचीं व नंतर अवतारांचीं असें उदाहरणें देण्याचें धोरण दिसतें. राम हें इष्टदैवत समर्थांना सर्वत्र अभिप्रेत असून राम दासाभिमानी न म्हणतां

**नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी**

म्हणण्यांत, इतर अवतारांचे दाखले हें एक कारण, एकदां हें दशक येऊन गेल्यामुळें पुनरावृत्ति नको हें दुसरें कारण, शिवाय आतां ओघ सगुणांतून निर्गुणाकडे, भक्तींतून ज्ञानाकडे जावयाचा असल्याकारणानें हि 'देव' हें सामान्य नाम येथें योजलें आहे. ह्या भागांत खालील सोळा उदाहरणें आहेत.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| (१) | अंबरीष | ११६ | (९) | नरसिंह (प्रह्लाद) | १२१, ९६ |
| (२) | उपमन्यु | ११६ | (१०) | इंद्र | १२२ |
| (३) | ध्रुव | ११७ | (११) | वामन | १२२ |
| (४) | गजेंद्र | ११८ | (१२) | भार्गवराम | १२२ |
| (५) | अजामिल | ११९, ९५ | (१३) | राम | १२३, ३२ |
| (६) | मत्स्य | १२० | (१४) | कृष्ण | १२४ |
| (७) | कूर्म | १२० | (१५) | बुद्ध | १२४ |
| (८) | वराह | १२० | (१६) | कल्कि | १२५ |

देवाचे नाना वेष, ते न जाणणारे पापी, त्यांत तल्लीन होणारे धन्य जीव—असे तीन उल्लेख करून ह्या आश्वासन प्रकरणाचा १२६ व १२७ श्लोकांत उपसंहार केला आहे.

१२८ ते १३२ पांच श्लोकांत मनाच्या श्लोकांच्या पूर्वार्धाचा, म्हणजे सगुण किंवा भक्तिपर भागाचा हि आतां उपसंहार करतात. उपसंहारांत उपक्रमांतील गोष्टी आणून त्यांची परिणति दाखविली आहे.

**मना वासना दुष्ट कामा नये रे** उपक्रम श्लो. ६

**मना वासना वासुदेवीं वसों दे** उपसंहार १२८ परिणति

**मना कल्पना ते नको विषयांची** उपक्रम श्लो. ५

**मना कल्पना वाउगी ते न कीजे** उपसंहार १२८ परिणति

निव्वळ विषयांची च नव्हे तर व्यर्थ कल्पना हि त्याज्य. ही परिणति.

**परी अंतरीं सज्जना नीववावें** उपक्रम श्लो. ८

**मना सज्जना सज्जनीं वस्ति कीजे** उपसंहार १२८ परिणति

सज्जनाला संतुष्ट करून त्याच्या च ठिकाणीं राहणें ही परिणति.

| | |
|---|---|
| **मना पापसंकल्प सोडूनि द्यावा** | उपक्रम श्लो. ५ |
| **मना सत्यसंकल्प जीवीं धरावा** | ,, ,, ५ |
| **मना अल्प संकल्प तो ही नसावा** | |
| **मना सत्य संकल्प चित्तीं वसावा** | उप. १३० परिणति |
| **मना अंतरीं सार विचार राहो** | उपक्रम श्लो. ४ |
| **विचारूनि बोले विवंचूनि चाले** | उप. १३२ परिणति |

उपक्रमोपसंहारांतलें साम्य व परिणति वरील उताऱ्यांवरून लक्षांत येईल. १२९ व्या श्लोकांत मनाला च मनातीत होण्यास सांगितलें आहे. भस्मासुर शेंवटीं आपल्या च डोक्यावर हात ठेवून भस्म झाला; त्याप्रमाणें मनाला वळवून वळवून शेंवटीं त्याला च मागें टाकण्याची ही भाषा आहे! १३१ व्या श्लोकांत समर्थांनीं आपली निष्ठा सकारण मांडली आहे. रामचंद्र च इष्ट दैवत मानण्याला श्लोकरचनेच्या दृष्टीनें मनाच्या श्लोकांत विशिष्ट विचारसरणी आहे. ती विचारसरणी थोड्या विस्तारानें उघड करून हा पुर्वार्ध समाप्त करूं.

श्रीसमर्थांची श्रीरामचंद्राच्या ठिकाणीं अनन्य भक्ति होती. इतर देवतांचा मनाच्या श्लोकांत फारसा उल्लेख नाहीं. शंकर-पार्वती रामभक्त म्हणून, गणपति शारदा नमन म्हणून, द्वादशादित्य, अका रुद्र, ब्रह्मदेव, इंद्र ह्या देवता ब्रह्मनिश्चयाच्या दृष्टीनें गौण म्हणून इतर देवतांचा उल्लेख आहे. प्रत्येक काळीं, प्रत्येक स्थळी, मनुष्यसमाजापुढें मर्यादापुरुषोत्तम रामचंद्र आदर्शभूत होऊन राहण्यासारखी रामचरित्राची थोरवी आहे. परंतु रामचंद्रांच्या चरित्रापलीकडे जाऊन रामचंद्रांना परमेश्वर मानण्याची व त्या दृष्टीनें त्यांच्या उपासनेची पद्धति

पूर्वसंतांनीं पाडलेली होती. ती च पद्धति रामदासांनीं मनाच्या श्लोकांत उचललेली आहे. ह्या पद्धतीमुळें व्यक्ताव्यक्ताची जोडी घातली जाते व साधकाला उपासना सोपी जाते. परमेश्वर ही अव्यक्त कोटि आहे. परमेश्वरी अवतार ही व्यक्त कोटि आहे. व्यक्त रामचरित्राकडे पाहून नीति, कर्मयोग, मर्यादा इ. गोष्टी साधकाच्या पचनीं पडण्यास उपयोग होतो व त्या च वेळीं, रामचंद्राचें ईशित्व लक्षांत येऊन अव्यक्त उपासनाबुद्धि मनांत ठस् लागते.

परंतु तुळशीदासादि पूर्वसंतांनी व त्याचप्रमाणें समर्थानीं येथें च न थांबतां राम म्हणजे च ब्रह्म अशी हि पद्धति पाडली आहे. परमेश्वर अव्यक्त आहे, परंतु सगुण आहे. परमेश्वरी अवतार सगुण साकार दोन्ही आहे; म्हणजे व्यक्त आहे. परंतु ब्रह्म अव्यक्त आहे इतकें च काय परंतु पूर्ण निर्गुण निराकार आहे. राम शब्दानें त्याचा हि बोध होईल अशी संतानी योजना केली. नीति आणि कर्मयोगासाठी रामचंद्र अवतार, भक्ति अथवा उपासनेसाठी रामचंद्र परमेश्वर व ज्ञानासाठी रामचंद्र परब्रह्म अशा तीन्ही कल्पना एके ठिकाणी केंद्रित करून संतांनी ही एकप्रकारें पूर्वी कधीं न झालेली अद्वैतसिद्धि च केली आहे !

समर्थानी मनाच्या श्लोकाचा उत्तरार्ध बहुतेक ज्ञानपर लिहिलेला आहे. त्यांत रामाची सगुण ईश्वरपर किंवा सगुण-साकार अवतारपर कल्पना कोठें हि नाही. असें असून हि राम शब्द वापरला आहे. त्याचा तरी हेतु हा च आहे. रामाच्या ठिकाणीं परब्रह्माची कल्पना करतां येते, राम शब्द ब्रह्मवाचक होऊं शकतो हे त्यामुळे मनावर बिंबलें जातें. नाहीं तर ब्रह्मवाचक वाङ्मय-

प्रतीक च पाहिजे असतें तर योगसूत्रकारांनीं दाखविल्याप्रमाणें तस्य वाचकः प्रणवः (यो. सू. पाद $\frac{१}{२७}$) ॐ कार सहज दाखवितां आला असता. परंतु त्या ऐवजीं

**सदा सर्वदा राम सन्नीध आहे** १८६
**नभासारिखें रूप ह्या राघवाचें** १९७

इत्यादि श्लोकांत मुद्दाम रामाचा उल्लेख केला. तसें च पूर्वार्धात जेथें भक्तिपर किंवा उपासनापर भाग आहे तेथें हि निर्गुण निराकार रामाची म्हणजे ब्रह्माची कल्पना या च ज्ञापकानें ठिकठिकाणी सहज आणलेली आहे.

**सदा सर्वदा देव सन्नीध आहे** ३६

किंवा

**जया वर्णिती वेदशास्त्रें पुराणें** १८, ३९

इ. श्लोकचरणांवरून हि ही खात्री होते. साकार वस्तु, सगुण वस्तु, सदा सर्वदा सन्निध असणें शक्य नाहीं. तेव्हां येथे सगुण भाग असून हि निर्गुण वर्णन आहे. तसें च वेदशास्त्रपुराणांनीं सर्वांनीं सगुण रामाचें वर्णन केलेलें नाहीं. येथला हा राम म्हणजे परब्रह्म राम आहे. त्यासंबंधीं च हा पूर्वार्धात म्हणजे उपासनापर भागांत उल्लेख आहे. असे उल्लेख अनेक आहेत. सगुणांत निर्गुण, निर्गुणांत सगुण, उपासनेंत ज्ञान, ज्ञानांत उपासना "शिवस्य हृदये विष्णुर्विष्णोश्च हृदये शिवः" अशी ही कल्पना राम शब्दानें, मनाच्या श्लोकांत ठिकठिकाणीं ज्ञापिलेली आहे.

मनाच्या श्लोकांत राममूर्तीची कल्पना हि डोकावते.

**विठोनें शिरीं वाहिला देवराणा** ८४

ह्या श्लोकांत पंढरपूरच्या विठोबाच्या मूर्तीचा उल्लेख आहे. त्यावरून राममूर्तीची उपासना समर्थांनीं गृहीत धरलेली दिसते.

**पदीं राघवाचे सदा ब्रीद गाजे** २९

ह्या चरणावर पू. नानासाहेब देवांनीं जी टीप दिली आहे ती रामाच्या पायांतील तोडरांना अनुलक्षून आहे. याचें कारण उघड आहे. पुढें ४२ व्या श्लोकांत

**दिनानाथ हें तोंडरीं ब्रीद गाजे** ४२

असें म्हटलें आहे. शिवाय

**मना चंदनाचे परी तां झिजावें** ८

या चरणावरून हि पूजार्थ उगाळल्या जाणाऱ्या चंदनाचा देखावा राममूर्तीपर्यंत कल्पनेनें पोंचवितो. तसें च

**अभाग्यास हें दृश्य पाषाण भासे** १३९

येथें हि पू. नानासाहेब देवांनीं मूर्तिपर अर्थ केला आहे. वस्तुत: सृष्टि ब्रह्मरूप आहे, ह्या अर्थाच्या पोषणार्थ हा चरण दिसतो. तथापि मनाच्या श्लोकांत मूर्तिपूजा गृहीत आहे असें दिसतें यांत मात्र शंका नाहीं. फरक इतका च कीं तसें स्पष्ट विधान कोठें हि नाहीं. यावरून

(१) परब्रह्म राम
(२) ईश्वर राम
(३) अवतार राम
(४) मूर्ति राम

अशा चार तऱ्हेनें रामाचा उल्लेख मनाच्या श्लोकांत आलेला आहे, हें लक्षांत येईल. त्यामुळें मनाच्या श्लोकांत रामाचें नांव

सर्वांत जास्त आलें आहे. राघव, रघुनायक, रघुराज जानकी-वल्लभ, जानकीनायक हीं नांवें हि पर्यायानें आलीं आहेत. कोदंड-धारी, चापपाणि असे हि पर्याय केले आहेत. एके ठिकाणीं समर्थ म्हटलें आहे. मनाच्या श्लोकांत श्रीराम व श्रीहरि एक च कल्पून, श्रीवर, हरि, चक्रपाणि, नारायण, वासुदेव, रमाकांत असा हि निर्देश केला आहे. राम या अर्थीं ' देव ' शब्द हि आणला आहे. देवदेव, देव-राय, देवराणा हे त्याचे च पर्याय आहेत. देव शब्द उत्तरार्धांत देवतावाचक म्हणून हि वापरला आहे. हे सर्व प्रकार सोडून ब्रह्माचा उल्लेख हि ठिकठिकाणीं उत्तरार्धांत आलेला आहे. येणेंप्रमाणें

( १ ) राम व रामपर्याय
( २ ) श्रीहरि व श्रीहरिपर्याय
( ३ ) देव व देवपर्याय
( ४ ) निव्वळ ब्रह्म

अशा चार तऱ्हेनें इष्ट वस्तु मांडली आहे. म्हणजे इष्ट वस्तूचे दोन प्रकार केले आहेत.

| | |
|---|---|
| १ सगुण— | १ राम<br>२ श्रीहरि<br>३ देव |
| २ निर्गुण— | ब्रह्म |

पूर्वार्धांत सगुण उपास्य व तदनुरोधानें सगुण उपासना मांडली आहे व उत्तरार्धांत निर्गुण उपास्य व तदनुरोधानें ज्ञान दाखविलें आहे. राम च इष्ट देवता ठेवण्याचें मनाच्या श्लोकांतील कारण हें असें आहे. मनाच्या श्लोकांतील उपदेशाला त्यांत अतिशय अनुकूलता आहे.

१३३ श्लोकापासून उत्तरार्धाला सुरवात झाली आहे. मनाच्या श्लोकांचा उत्तरार्ध पूर्वार्धाच्या मानानें विस्तारानें व महत्त्वानें हि लहान आहे. ह्याचें कारण उघड आहे. समर्थांचें वैशिष्टच ब्रह्मज्ञानाच्या मांडणींत नसून, तें नीतिधर्माच्या भक्तिपर मांडणींत विशेष असल्यामुळें, तो भाग स्वाभाविकपणें च विस्तारानें व वर्णनानें जास्त खुलून दिसतो. शिवाय ब्रह्मज्ञानाशिवाय पूर्णता नाहीं म्हणून पूरकतेसाठी च हा उत्तरार्ध असल्यामुळें असें होणें स्वाभाविक आहे.

ह्या ज्ञानपर भागाचे एकदम मोठे असे स्थूल मानानें तीन भाग पडतात. १३३ ते १७३ पहिला भाग, १७३ ते १९३ दुसरा व १९४ ते २०१ तिसरा. पहिल्या व दुसऱ्या भागांत ब्रह्मवर्णन-दृष्टीनें सारखेपणा आहे. तरी पहिल्या भागांत मुख्य ब्रह्मवर्णन आलेलें आहे. पहिल्या भागांत सत्संगपंचक व दुसऱ्या भागांत निःसंगचतुष्क हा भेद आहे. तसें च पहिल्या भागांतलें ब्रह्मवर्णन सरळ असून दुसऱ्या भागांत देवरूपानें तें केलेलें आहे. उपसंहारांत हि ही रचना आली आहे.

**मना सर्व ही संग सोडून द्यावा** २०३ चरण १

हा चरण

**परी संग सोडूनि सूखें रहावें** (१८७-१९०)

ह्या चतुष्काकडे लक्ष ठेवून लिहिलेला दिसतो. तसें च

**अती आदरें सज्जनाचा धरावा** २०३ द्वितीय चरण

हा दुसरा चरण

**सदा संगती सज्जनाची धरावी** १६३-१६७

ह्या पंचकावरून आलेला दिसतो. पहिल्या भागांत सत्संग

दाखविल्यावर दुसऱ्या भागांत निःसंगत्व दाखविण्यांत परिणतीची हि दृष्टि असावी. 'सत्संगत्वे निःसंगत्वं' हें वचन प्रसिद्ध च आहे. शिवाय पहिल्या भागांत ब्रह्म निर्गुण निराकार आल्यामुळें सज्जनसंग हा सगुण आधार दिला. तसें च दुसऱ्या भागांत देव ब्रह्मरूप असला तरी

**तिन्ही लोक जेथूनि निर्माण झाले १७९**

असा गुणरूप असल्यामुळें निःसंगता ही निर्गुण पायरी दाखविली आहे. आणि अशा रीतीनें दोहोंकडे समानत्व साधलें आहे. पहिल्या भागांत योग्याचें वर्णन आहे तसें दुसऱ्या भागांत गुरूचें वर्णन आलें आहे. बुद्धिद्वारा, विवेकाच्या मार्गानें, विद्येचा आश्रय करून, ब्रह्मज्ञानाशीं गांठ घेण्याची पहिल्या भागाची दृष्टि दिसते. त्यामुळें शास्त्रादि विद्याभ्रम व तज्जन्य अहंतेचा उल्लेख पहिल्या भागांत आला आहे. तसा दुसऱ्या भागांत आलेला नाहीं. त्यामुळें पहिला भाग देहबुद्धि, अहंकारनाश इ. साधनदृष्टीनें हि जास्त महत्त्वाचा झाला आहे. दुसऱ्या भागांतलें देवशोधनाचें तत्त्व 'जन्माद्यस्य यतः' ह्या सूत्राचें स्मारक दिसतें. ब्रह्मवर्णनांत

**असें सार साचार तें चोरलेसें** १७१
**जगीं थोरला देव तो चोरलासे** १७९
**फुटेना तुटेना चळेना ढळेना** १४७
**सदा संचलें मीपणें तें कळेना** १४७
**तुटेना फुटेना कदा देवराणा**
**चळेना ढळेना कदा दैन्यवाणा**
**वसेना दिसेना जगीं मीपणासी** १७७

हीं ब्रह्म व देवाचीं अनुक्रमें गुप्तता व स्थाणुत्व दर्शविणारीं समान वचनें एकदम लक्ष वेधून घेतात.

तिसऱ्या भागांत प्रश्नोत्तररूपानें जीव ब्रह्माचें ऐक्य दाखविलें आहे. म्हणजे

(१) केवळ ब्रह्म
(२) देव ब्रह्म
(३) जीव ब्रह्म

अशी मांडणी केलेली आहे. किंवा असें हि म्हणतां येईल कीं ब्रह्म–आत्मा–जीव ह्या तीहींचें साधनांसह ऐक्य दाखवून अद्वैत-सिद्धि केलेली आहे.

आतां क्रमानें ह्या तीन्ही भागांचें व त्यांतील पोटविभागांचें संगति व सारदृष्टया अवलोकन करावयाचें. पूर्वार्ध संपल्या-बरोबर एकदम योग्याचें चित्र पुढें उभें केलें आहे. योगी हा ज्ञानी आणि भक्त ह्यांना जोडणारा आहे. पूर्वार्ध उत्तरार्धाच्या तो सांध्यावर आहे. म्हणून १३३ व्या श्लोकांत भक्तवर्णन व १३४ व्यांत योग्याचें वर्णन मिळून योगिराणा असें हें संयुक्त वर्णन केलें वाहे. दोन्ही प्रकरणांच्या किंवा भागांच्या अगदीं सांध्यावर योगी उभा राहून दोहोंचा मेळ घालतांना पाहून मोठें कौतुक वाटतें ! प्रथम च योगी दाखविण्याचें आणखी हि एक कारण आहे. पूर्वार्धाप्रमाणें च उत्तरार्धांत हि सत्संगावर मुख्य भर आहे. परंतु हा सत्संग म्हणजे केवळ नीतिमान् माणसाचा संग नव्हे. उत्तरार्धांत सत्संग हें साधन योगी, संत, गुरु, अशा तीन तऱ्हेनें आलेलें आहे. तेव्हां सत्संग हें साधन दाखविण्यापूर्वी च सत्संगाचा खुलासा व्हावा ह्या हेतूनें प्रथम च योगी पुढें उभा केला आहे. दासाच्या तुलनेंत योग्याचे गुण पूर्वार्धांत दाखविल्या-मुळें येथें ते दाखविण्याचें प्रयोजन उरत नाहीं. योग्याच्या वर्णना-

नंतर १३५–१३६ ह्या दोन श्लोकांत सर्व उत्तरार्धाचें सूतोवाच केलें आहे. उपक्रमोपसंहारावरून ही गोष्ट लक्षांत येईल.

**बळें भाव सद्बुद्धि सन्मार्ग लागे**
**महा क्रूर तो काळ विक्राळ भंगे** १३५ उपक्रम
**जयाचेनि संगें महादुःख भंगे**
**जनीं साधनेवीण सन्मार्ग लागे** २०३ उपसंहार

उपक्रमोपसंहाराची सत्संगपर जुळणी ह्या दोन्ही ठिकाणच्या तुलनेनें स्पष्ट होईल. संसार हा भयानक आहे. त्यांत कालभय हा केवळ एक भाग आहे. ह्या भयाचें कारण द्वैत हें आहे. ही गोष्ट १३६ मध्यें दाखविली आहे. द्वैतनाश म्हणजे च ज्ञान, म्हणजे च अभयप्राप्ति. 'अभयं वै जनक प्राप्तोऽसि' 'भयं द्वितीयाभिनिवेशतः स्यात्' इ. वचनांवरून हि ही च गोष्ट सिद्ध होते.

**जया पाहतां द्वैत कांहीं दिसेना १३६**
**मनीं मानसीं द्वैत कांहीं वसेना २०१**

अद्वैतपर उक्रमोपसंहारावरून ही वस्तु ध्यानांत येते.

उपक्रम झाल्यानंतर १३७ ते १४१ 'जुनें ठेवणें मीपणें तें कळेना' ह्या पंचकाच्या द्वारें मुख्य अहंकार व तदंतर्गत इतर द्वैतकारणें दाखविलीं आहेत.

( १ ) देहबुद्धि १३७, १३८
( २ ) अभावबुद्धि १३९
( ३ ) त्रिगुणवशता १४०

अहंकारांतर्गत हीं तीन द्वैतकारणें दाखवून १४१ मध्यें गुरुशरणतेचा

तद्विरुद्ध उपाय सांगितला आहे व १४२ मध्यें द्विरुक्तीनें वस्तुदुर्लभता सूचित केली आहे.

१४३ ते १४५ मुख्यत: अविद्या व तदनुरोधानें विद्या दाखविली आहे. मागील अहंकारांतर्गत द्वैतकारणें ह्या एका च अविद्या शब्दांत येऊन जातात. १४५ मध्यें अहंभाव, अज्ञान, विषयचिंतन हे तीन्ही उल्लेख अविद्येचे च आहेत.

**स्फुरे वीषयीं कल्पना ते अविद्या**
**स्फुरे ब्रह्म रे जाण माया सुविद्या** १७२

विद्येचीं व अविद्येचीं लक्षणें अनेक असलीं तरी, वरील वचनांत स्पष्ट व्याख्या च दिली आहे. ह्या दृष्टीनें १४४ श्लोक ह्या विद्यासाधनाचा आहे.

अविद्या १४३
विद्यासाधन १४४
अविद्यालक्षण १४५

असा हा विभाग आहे.

१४६ ते १५१ ब्रह्मवर्णन असून ब्रह्माची सत् व अनंत हीं मुख्य दोन विशेषणें या पंचकांत अनुवृत्त केलीं आहेत व पुढील वर्णन केलें आहे.

दृश्याचें क्षणभंगुरत्व १४६
अदृश्य ब्रह्माचें तद्विरुद्ध स्थाणुत्व १४७
अदृश्याची सर्वाधारता १४९
अदृश्याची सर्वकरणागोचरता १४९
अदृश्याची वर्णादिविषयरहितता १५०

१४८ व्या श्लोकांत 'अती आदरें सत्य शोधूनि पाहें' असा

उपदेश आहे. तदनुसार १४६ व्या श्लोकांत दृश्य हें क्षणभंगुर अतएव असत्य असून, अदृश्य ब्रह्म हें स्थाणु असल्यामुळें सत्य आहे असें दर्शित केलें आहे. जर ब्रह्म सत्य आणि दृश्य जग मिथ्या आहे तर तें दिसतें कसें ? ह्या प्रश्नाचें उत्तर त्याला सर्वाधारत्व आहे ( १४९ ) ह्यांत आलें आहे. दृश्य दिसतें त्याचें कारण ब्रह्माचा त्याला आधार आहे. मग असें आधारभूत, सत्य, दृश्य दाखविणारें ब्रह्म असून तें स्वत: कसें दिसत नाहीं ? ह्या प्रश्नाचें––तें सर्वकरणागोचर असून वर्णादि विषयरहित असल्या-मुळे 'दृश्य वस्तु' होऊं शकत नाहीं, असें १४९–१५० ह्यामध्यें उत्तर मिळतें. त्याच्या बाबतींत

**जगीं पाहतां पाहणें जात आहे** १४९

हें च खरें आहे ! 'शब्दस्पर्शादिविषयरहित' असें न म्हणतां

**नसे पीत ना श्वेत ना शाम कांहीं** १५०

असें म्हणण्यांत, म्हणजे वर्णादिविषयरहितता दाखविण्यांत हेतु आहे.

**दिसे लोचनीं तें नसे कल्पकोडी** १४६

अशी दृश्यापासून सुरवात झाल्यामुळें वर्णरहितता दाखवावी लागली आहे व नेहमींचा शब्दस्पर्शरूपरसगंध इ. क्रम सोडावा लागला आहे. वर्ण म्हणजे रूप. उपक्रमाप्रमाणें उपसंहार सांभाळावा लागतो. हें त्यांत धोरण आहे. ब्रह्माला सत् आणि अनंत म्हणण्यांत हि धोरण आहे. सत् असल्यामुळें त्याला सर्वाधारत्व आहे. व अनंत असल्यामुळें तें दृश्यातीत आहे. तसें च दृश्य हें ज्या अर्थीं दृश्य आहे त्या अर्थीं सांत आहे. आणि सांत असल्यामुळें च असत्

आहे. असें ह्या पांच श्लोकांत अतिशय खुबीनें थोडक्यांत ब्रह्मवर्णन केलें आहे.

**‘ ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ’**

ह्या सूत्राचें कारणासहित अतिशय सुंदर ग्रथन येथें करून १५१ व्या श्लोकांत सत्सहवासानें त्या ब्रह्माचा शोध हळू हळू होईल असा उपसंहार केला आहे.

दृश्य सृष्टि मिथ्या ठरविल्यानंतर तत्त्वज्ञानादि निरनिराळ्या चिंतनविषयांसंबंधीं किंवा अदृश्यसृष्टीसंबंधीं १५२ ते १५८ पर्यंत सांगतात.

(१) ब्रह्म हें चिंतनाच्या या अनेक विषयांपासून भिन्न आहे १५२, १५३

(२) महावाक्यादि वेदान्तविषय हि खुणेदाखल आहे १५४

(३) ब्रह्म सर्वव्यापक असल्यानें त्याला मीपणानें पाहतां येणार नाहीं आणि वरील सर्व विषयांस मीपणाची आवश्यकता आहे. १५५, १५६

(४) त्याशिवाय ह्या विषयांत परस्परांमध्यें मेळ हि नाहीं. १५७, १५८

ह्या सहा श्लोकांत जे निरनिराळे विषय मांडले आहेत त्यांत खालील उल्लेख आहेत.

(१) पिंडज्ञान = शारीरशास्त्र
(२) तत्वज्ञान = भौतिकशास्त्र } १५३ श्लो.
(३) तानमान = संगीतशास्त्र १५४ श्लो.

(४) महावाक्य पंचीकरण = वेदान्तशास्त्र
(५) श्रुती, वेद
(६) न्याय, तर्कशास्त्रें = (बहुता इतर दर्शनें) } १५८ श्लो.

(७) मीमांसक = मीमांसा
(८) स्मृति } १५८ श्लो.

ह्यावरून विचारसृष्टींतलीं सर्व शास्त्रें ब्रह्मज्ञानाला निरुपयोगी असून वेदान्तशास्त्र हि खुणेपुरतें च व सज्जनांकडून समजून घेतलेलें ह्या अटीवर मान्य केलेलें दिसतें.

ज्या प्रमाणें शब्दस्पर्शरूपरसादि स्थूल दृश्यसृष्टि देहबुद्धि वाढविते म्हणून ब्रह्मचिंतनांत त्याज्य, त्याप्रमाणें नाना शास्त्रांची विचारसृष्टि हि ब्रह्मचिंतनांत निरुपयोगी असून, खऱ्या ब्रह्म-विद्येचा स्पर्श हि न होतां, पुढील विद्याभ्रमाला कारण होण्याचा संभव म्हणून त्याज्य. हें १५९ ते १६२ मध्यें दर्शित केलें आहे.

| | | |
|---|---|---|
| अहंकार | १५९ | = विद्याभ्रमाचा परिणाम |
| वाद | १६० | |
| व्यर्थ बडबड | १६१ | |
| नीतिनाश | १६२ | |

विद्याभ्रमामुळें अहंकार व देहबुद्धि नष्ट होण्याऐवजीं वाढत असल्यामुळें तो सर्व पसारा टाकून नम्रपणें सत्संगाचा आश्रय करण्याचा १६३ ते १६७ मध्यें म्हणजे ‘ सदा संगती सज्जनाची धरावी ’ ह्या पंचकांत उपदेश केला आहे. सत्संगा-बरोबर पुढील प्रयत्न हि दाखविला आहे.

( १ ) देहावरची ममता आत्म्यावर ठेवणें १६३
( २ ) विषयकल्पना व एकंदर कल्पनात्याग १६४

| | | |
|---|---|---|
| ( ३ ) | निर्गुणध्यान | १६४, १६५ |
| ( ४ ) | अहंकारविस्तारछेद | १६६ |
| ( ५ ) | शाश्वत ब्रह्मनिश्चय | १६७ |
| ( ६ ) | क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम् । | १६७ |

१६८ ते १७० पर्यंत संताची ओळख, परिप्रश्न व तद्वारा बोध दाखविला आहे. बोध नवीन नाहीं. सत्संगतींत हि त्याचा उल्लेख आलेला च आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| ( १ ) | अहंकारविस्तारनाश | १६९ | १६६ |
| ( २ ) | निर्गुणध्यान | १६९ | —१६४, १६५ |
| ( ३ ) | देहबुद्धित्याग | १६९, १७० | १३८ |
| ( ४ ) | अध्यात्मशोध | १७० | १४४, १५१ |

आंकड्यावरून ही गोष्ट लक्षांत यावी. संताची ओळख महत्त्वाची आहे. बाह्योपाधीवरून संत न ओळखतां अंत:शांतीवरून त्याची ओळख करून घ्यावी ( १६८ ) हें महत्त्वाचें सूत्र आहे.

१७१ ते १७३ मध्यें उत्तरार्धांतील प्रथम प्रकरणाचा उपसंहार केला आहे.

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | ब्रह्मज्ञानाची गूढता | १७१ |
| ( २ ) | विद्या अविद्या व्याख्या | १७२ |
| ( ३ ) | ब्रह्मज्ञानांतील मुख्य अडचण ( अहंकार ) | १७३ |

असें उपसंहाराचें स्वरूप आहे. प्रथम च

**जुनें ठेवणें "मीपणें" तें कळेना १३७–१४१**

ह्या पंचकानें जी अडचण मांडली ती च उपसंहारांत पुन्हां दाखवली. विद्येच्या द्वारें म्हणजे विवेकाच्या द्वारें ब्रह्मप्राप्तीच्या प्रयत्नाचा

हा भाग येथें समाप्त झाला. 'जुनें ठेवणें' ह्या पंचकानंतर १४३ मध्यें 'अविद्ये' चा उल्लेख आला होता तो हि उपसंहारांतील विद्या अविद्या यांशीं अनुसंधानें पहावा.

ज्ञानप्राप्तीसाठीं विवेकमार्गानें उपाय दाखविल्यानंतर भाव-प्रवण मनाला देवाच्या आलंबनाचा हि एक उपाय उपयोगी आहे. म्हणून हा भाग सुरूं करतात. व तदनुसार १७४ व्या श्लोकांत देवाची ब्रह्मपर कल्पना मांडतात. ह्या श्लोकाच्या अर्थासंबंधीं मतभेद आहेत. म्हणून त्याचा प्रत्येक चरण घेऊन अर्थ मांडूं.

( १ ) ह्या देवाला डोळ्यानें पाहूं म्हटलें तर पाहतां येत नाहीं. म्हणजे ती गोष्ट शक्य नाहीं.

( २ ) भवाचें म्हणजे संसाराचें भक्षण म्हणजे नाश केल्या-नंतर तो देव राखूं म्हटलें तरी त्याचें रक्षण होऊं शकत नाहीं. संसारनाशानंतर देवत्वाची हि कोटी नष्ट होते.

( ३ ) असा तो देव नेहमीं क्षयातीत मोक्षप्राप्ति करून देतो.

( ४ ) दयादक्ष असल्यानें तो साक्षित्वानें च परंतु साधकाला मदत करतो–त्याचा पक्ष घेतो.

ह्या श्लोकाच्या ह्या अर्थानें देवाचें स्वरूप स्पष्ट झालें.

१७५––१७६ मध्यें गौण देवांचें वर्णन व मुख्य देवाची गुप्तता दर्शविली आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | ब्रह्मदेव | १७५ |
| २ | शंकर | १७५ |
| ३ | आदित्य | १७६ |
| ४ | रुद्र | १७६ |
| ५ | इंद्र | १७६ |

असे देवांचे उल्लेख आहेत.

**परी शेंवटीं शंकरा कोण जाळी** १७५

ह्या चरणानें रामदासांची स्वच्छ व्यक्तिनिरपेक्ष विचारसरणी दिसून येते.

१७७ मध्यें देवाचें ब्रह्माप्रमाणें स्थाणुत्व दाखविलें आहे.

१७८–१७९ मध्यें खऱ्या देवशोधनाची दुर्मिळता दाखविली आहे.

१८० ते १८३ गुरूचीं लक्षणें दिलीं आहेत. देव हि अव्यक्त कोटि असल्यामुळें गुरूच्या सहाय्याशिवाय त्याचा लाभ होणार नाहीं अशी कल्पना मांडली आहे.

| | |
|---|---|
| १८०, १८१, १८२ | निषेधक लक्षणें |
| १८३ | विधायक लक्षणें |

असे दोन विभाग पाडून गुरुलक्षणें दिलीं आहेत.

१८४ ते १८६ आकलन आणि ऐक्योपदेश केला आहे. गुरुशरणतेनें ब्रह्मस्वरूपाचें आकलन होऊं लागल्याचें १८४ मध्यें दाखविलें आहे. १८५, १८६ मध्यें राम शब्दद्वारा–देवाशीं ऐक्य साधण्याचा उपदेश केला आहे. ऐक्य दोन तऱ्हेनें ( १ ) रामांत लीन होऊन मरणें (लपून जाणें) (१८५) व रामांत सान्निध्यानें रमणें ( १८६ ) अशा ऐक्याच्या दोन रीति आहेत. पहिलींत निर्गुणतेकडे झोंक आहे. दुसरींत सगुणाकडे.

१८७ ते १९० चार श्लोकांत निस्संगतेचा उपदेश केला आहे. १८७, १८८ ह्या दोन श्लोकांत

( १ ) ब्रह्माची निःसंगता १८७

( २ ) निःसंगता साधन–

१ देहभानछेद
२ भक्ति } १८८
३ विरक्ति

सांगितलें आहे. १८९–१९० श्लोकांत देववर्णन केलें आहे व तद्वारा निःसंगता दाखविली आहे.

( १ ) निर्मातृत्व, सगुणत्व १८९

( २ ) निःसंगत्व १९०

अशी वर्णनाची रचना आहे.

१९१ मध्यें ब्रह्मज्ञानांतला देहबुद्धि आणि अहंकार हा मुख्य अडथळा सांगितला आहे. एतत्संबंधीं हा शेंवटचा च उल्लेख आहे.

१९२–१९३ मध्यें 'नेति' 'नेति' अशा स्वरूपाचें देववर्णन केलें आहे.

१९४ मधला प्रश्न वस्तुतः जीवासंबंधीं आहे. 'देह सोडल्यानंतर त्याचें काय होतें ?'—परंतु सर्वैक्य दाखविण्याच्या दृष्टीनें त्याला २०० श्लोकापर्यंत उत्तर दिलें आहे. आकाशाचा दृष्टांत देऊन ब्रह्माची

'( १ ) सर्वव्यापकता—( महतो महीयान् ) १९५

( २ ) अणूमध्यें हि व्याप्ति–( अणोरणीयान् ) १९६

दाखविली आहे.

( ३ ) त्याच्या चिंतनानें कृतार्थता हि दाखवून शेंवटीं १९७

( ४ ) आकाशदृष्टांतवैगुण्य दर्शित केलें व १९८

( ५ ) त्याची तर्कातीतता मांडून १९९
( ६ ) त्याच्या दर्शनानें झालेली अवस्था २००

प्रकट केली आहे.

२०१ ते २०४ उत्तरार्धाचा उपसंहार आहे.

(१) द्वैतनाश २०१
(२) ह्या गुह्याचें जतन २०२
( श्रवण यत्नादिद्वारां )
(३) संगति आणि निःसंगता २०३, २०४

असें उपसंहाराचें स्वरूप आहे. उपक्रमाशीं ह्या स्वरूपाचा मेळ कसा आहे हें आरंभीं च दाखविलें आहे.

शेंवटचा श्लोक मन च्या श्लोकांच्या श्रवणाचें फलित दाखविणारा आहे.

(१) दोष नाश
(२) साधनयोग्यता
(३) ज्ञानवैराग्यसामर्थ्यप्राप्ति
(४) मोक्ष

असें पायरीपायरीचें चतुरंग फल आहे. ह्यापैकीं एकाची हि प्राप्ति होत नाहीं, असें दिसेल तर तें श्रवण नव्हे ! केवळ श्रवणानें हा चतुरंग-लाभ होईल असा संभव नाहीं. श्रवण ह्या एका च शब्दांत-मनन, चिंतन, आचरण, अशा आणखी तीन गोष्टी समाविष्ट आहेत. पैकीं आतांपर्यंत केलेलें विवेचन मनन चिंतनाला दिग्दर्शक व्हावें ह्या हेतूनें केलेलें आहे. त्या विवेचनाप्रमाणें मनाच्या श्लोकांची आतां अनुक्रमणी देऊन समाप्ति करावयाची. अनुक्रमणी तीन तऱ्हेची

(१) स्थूल (२) मध्यम (३) सूक्ष्म

हें सर्व विवेचन ही एक प्रकारें सूक्ष्म अनुक्रमणी च आहे. स्थूल अनुक्रमणी कंसापुढें दिली आहे व मध्यम अनुक्रमणी त्या कंसाच्या आंत आहे. ही अनुक्रमणी संगति आणि सारग्रहणाला उपयोगी व्हावी असा अंदाज आहे. ह्या श्लोकांत चतुष्क, पंचकें आणि दशकें हि आलेलीं आहेत. त्यारून प्रथम, पंचक,दशक वगैरेची रचना करून, मग हे श्लोक रचले असावे; असें हि एक अनुमान आहे. कसें हि असो. त्यामुळें सुसंगतीला बाध आलेला नाहीं. ही गोष्ट ह्या विवेचनावरून हि लक्षांत येईल.

---

# अनुक्रमणिका

## १

## भक्तिपर पूर्वार्ध

| | | |
|---|---|---|
| १७ पूर्वोपदेशस्मरण | ५८–६० | ४ साधनहीनता आणि दीनता |
| १८ दीन पुरुष | ६१–६४ | |
| १९ पूर्वोपदेश दीनपुरुषोपसंहार | ६५ | |
| २० रामचिंतनोपक्रम | ६६ | ५ राम आणि नाम |
| २१ रामचिंतन | ६७–७६ | |
| २२ रामचिंतनोपसंहार | ७७–८० | |
| २३ नाममाहात्म्य | ८१–१०१ | |
| २४ सत्क्रियोपदेश | १०२–१०७ | ६ क्रिया आणि वाचा |
| २५ वाद आणि संवाद | १०८–११५ | |
| २६ देवाचें आश्वासन | ११६–१२७ | ७ आश्वासन आणि उपसंहार |
| २७ पूर्वार्धाचा उपसंहार | १२८–१३२ | |

## २

## ज्ञानपर उत्तरार्ध

| | | |
|---|---|---|
| २८ योगी | १३३–१३४ | २ केवल ब्रह्म |
| २९ उपक्रम | १३५–१३६ | |
| ३० अहंकार | १३७–१४२ | |
| ३१ अविद्या विद्या | १४३–१४५ | |
| ३२ ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या | १४६–१५१ | |
| ३३ विद्याभ्रम | १५२–१५८ | |

## श्री श्लोक मनाचे–शब्दसूचि व पदसूचि

**अकस्मात्**– [ अकस्मात ] ( अ-किम्-स्मात् ) क्रि. वि. अेकाअेकीं, पूर्वचिह्नाशिवाय. १३, १५-१७, ४५, १४६.

**अक्रा**–[ अक्रा ] ( अेकादश ) सं. वि. दहा आणि अेक. १७६.

**अखंडीत**–[ अखंडीत ] ( अ-खंड्-त ) क्रि. वि. निरंतर, मध्यें काल-स्थलाच्या व्यत्ययाशिवाय १८६.

**अगाधु**–[अगाधु] (अ-गाध्=प्रतिष्ठा) वि. पु. अतलस्पर्श, गंभीर, ज्याचा पार लागत नाही असा. १८१.

**अंगण**– [ तारांगणें, तारांगणीं ] ( अंग=गमन करणें-अन् ) न. ज्यां मधून गमन केलें जातें. तारा+ = तारकायुक्त आकाश. ३३; ११७.

**अंगिकारु**–[ अंगिकारु ] (अंग्-कृ)धा. पूर्वीं नसलेल्याचा आपला म्हणून स्वीकार करणें. ६.

**अजामेळ**–[ अजामेळ] ( अजामिल् ) वि. ना. पु. पुत्राच्या 'नारायण' नामानें मुक्त झालेला पुरुष-विशेष. ९५, ११९.

**अज्ञान**– [अज्ञान] ( अ-ज्ञान ) ना. १४४, १९१ ज्ञानहीन वि. १३७, १४४, १४५, १९१.

**अंजन**– [ अंजनेवीण ] ( अंजन-अ= अंजना. जी अंजनवत् काळी आहे. तिचा पुत्र. ) वि. ना. पु. हनुमान्. १४१.

**अंड**–[ब्रह्मांड] (अम्=गमन करणें-ड= ज्यांतून शवाक निर्गमन करतें) न. ब्रह्म+ = विश्व. १३६,१८७.

**अतर्क**–[अतर्कासि] (अ-तर्क) न. तर्क होऊं शकत नाहीं असें, =ब्रह्म. १५६.

**अती**–[अती] ( अत=सातत्य गमने ) अ. अधिक. ९,४०,५९,६४,६५, ८१, ८३, ८८, ८९, ९१, ९२, १०१,१०२,१०५, १४४, १८५, १९९, २०३.

**अतीत**–[ क्षयातीत, भयातीत, मनातीत] (अति-ई-त) वि. त्रि. पलीकडे गेलेल. १७४; १३६, १८५; १२९.

**अदृश्य**–[अदृश्य] (अ-दृश्य) वि. त्रि. दृष्टीला अगोचर. १९३.

**अधोमूख**–[अधोमूख] (अधस्-मुख) वि. त्रि. उलट, खाली तोंड असलेल. २०.

**अनन्य**–[अनन्यास] (अन-अन्य) पु. एकनिष्ठ. ३५.

**अनाचार**–[अनाचार] (अन-आचार) पु. गर्हित आचार, दुराचार. ६९.

**अनाथ**–[अनाथा, अनाथास] (अ-नाथ) त्रि. नाथहीन, निराश्रय. १२५; ११९.

**अनीती**–[अनीती बळें] (अ-नीती) स्त्री. कुनीति. १६२.

**अनु**–[अनुरेणु] (अण्-ऊ) वि. त्रि. सूक्ष्म. १९६.

**अनुर्वाच्य**–[अनुर्वाच्य] (अ-निर्वाच्य) वि. न. ज्याचें निरूपण होऊ शकत नाहीं, जें वाचाविषय होऊं शकत नाहीं. १८४.

**अनुवाद**–[तत्त्वचितानुवादें] (अनु-वद) पु. तदनुसार बोलणें, पुन्हां सांगणें, निरूपण करणें. ५२.

**अनेक**–[अनेकीं] ( ४९.

**अंत**–[अंत, अंतकाळीं, कल्पांतकाळीं वेदांतवाक्यें, येकांत] (अम्=गमन करणें-त) पु. (१) मरण ९७, ११९, (२) पार १६९, १९३ (३) शेवट १९१. (४) रहस्य १५८. (५) स्थिति १३०. ९७, ११९. १६९, १९३; ८४. ८५; १९१; १५८; १३०.

**अंतर**–[अंतरा, अंतरातें, अंतरीं, अभ्यांतरी, प्रमाणांतरें] (अन्त-र) न. (१) हृदय. (२) भिन्न प्रकार १६२ प्रमाणांतरें बुद्धि सांडूनि जातें. ६१; ८०, ४, ८, २६, ३७, ५०, ५५, ५६, ६१, ६२, ७९, ८३, ८४, १५०, १६२, १६५, २०२; ११४, १६२.

**अन्न**–[अन्न, अन्नदाता] (अद-न) न. भक्ष्य.+दाता=देव. ८९, १५९; ९३,

**अपहारी**–[शोकापहारी] (अप-हृ-इन्) वि. त्रि. नष्ट करणार. शोक+ = नाश ८६.

**अभागी**–[अभागी, अभाग्यास] (अ-भज्-इन्-) वि. त्रि. मद भाग्य, भाग्यहीन. हतभाग्य. ८२; १३०.

**अभाव**–[अभावे] (अ-भू-अ) पु. अविद्यमानता. असत्ता. १३९.

**अभिमानी**–[दासाभिमानी, भक्ताभिमानी] (अभि-मन्-इन्) वि. पु. मूळ अर्थ अहंकारी परंतु

**अहिल्या**– [ अहिल्या ] अहिला पहा. ३२.

**अहो**–[अहो] (अ-हि) अ. कारुण्यार्थी संबोधन. ७८.

**आकळ**–[ आकळे, आकळेना ] ( आ-कल् = गतौ संख्याने च ) धा. आकलन होणें, समजणें २००; १३७,१४३,१७१,१९१.

**आकार**–[ आकारलें ] (आकार नाम-धातु) धा. आकार प्राप्त होणें. १४६.

**आक्षै**–[ आक्षै ] (अक्षय) क्रि. वि. सदोदित, नियमाने, नेहमीं. १७४.

**आगळ**–[ आगळा, आगळें ] (अग्र-ल) वि. त्रि. श्रेष्ठ. ३१, ६८; ९०, १५२.

**आंग**–[ आंगीं ] (अंग-अ) न. अवयव, आंगीं = स्वतःच्या ठिकाणीं. १३४, २०५.

**आचर**–[ आचरावे ] आ-चर्=गतौ) धा. वागणें. ११५.

**आछयाद**–[ आछयादिलें ] (आ-छद्) धा. आवृत होणें, झांकणें. १७३.

**आट**–[आटली] (आ. तर् हिंसायाम्) धा. नष्ट होणें. २००.

**आठऊं**–[आठऊं] (आ-ध्यै चिंतायाम्) पु. चिंतन, स्मरण. १६९.

**आठव**–[आठवावा] (आ-ध्यै) धा. स्मरण करणें. ७४, १६९.

**आडळ**–[आडळेना] (हस्त-तल) धा. हाताला लागणें, प्राप्त होणें. १५५, १७६.

**आण**–[आणूं] (आ-ज्ञा) धा. जाणीव ठेवणें, १२,

**आणि**–[ आणि ] ( अन्यत् ) अ. समुच्चयार्थी. १४.

**आणीक**–[आणीक] आणि पहा. १०३.

**आतां**–[आतां] (अतः, अत्र) अ. या पुढें ४२, ९४; येथें ६०, ४२, ६०, ९४.

**आत्मन्**–[आत्मबुधी] (अत्=सातत्य-गमने)पु. आत्मा, ब्रह्म. १६३.

**आदर**–[आदरे, आदरेंसी] पु. स्नेह, भक्ति. ४०, ४४, ५९, ६५, ८१, ८३, ८९, ९१, ९२, ९४, १०१, १०५, १२६, १४४, १८५, १९४, २०३, १०२.

**आदिक**–[ तत्त्वादिकें, ब्रह्मादिकांचा, स्त्रियापुत्रमित्रादिकें ] (आदि--क) वि. त्रि. प्रभृति. १५४; १४८, १६६.

११४, १२५. १२९, १३६, १४४, १४९, १५५, १५७, १६१, १८६, १८७, १९८, १९९.

**अिन्द्र**–[ गजेन्द्र ] ( अिद् = आधिपत्य करणें -र ) पु. श्रेष्ठ. ११८.

**अिष्ट**-–[ अिष्ट ] ( अिष्-त ) वि. त्रि. अभिलषित योग्य. ८७.

**अीश**–[ अीश, गणाधीश, पार्वतीशें ] ( अिश् = आधिपत्य करणें-अ ) पु. स्वामि, पति. गण+ = गणपती पार्वती+ = शंकर. १; १; ८२.

**अीश्वर**–[ योगेश्वरांचा ] ( अिश् वरच् ) पु. अीश पहा. ८५.

**अुच्चार**–[ अुच्चारितां ] ( अुत् चर् ) धा. अुच्चार करणें, तोंडानें म्हणणें, जप करणें. ७२.

**अुड**–[ अुडाला, अुडाली ] ( अुत् डी ) धा. नष्ट होणें. ६२ ; १२७.

**अुडी**–[ अुडी ] ( अुत्-डी ) स्त्री. अुडी घालणें = ताबडतोब मदतीसाठी हजर होणें, धांवून येणें. २७ ११८.

**अुतम**-[ अुत्तमाचा, सर्वोत्तमाचा, सर्वोत्तमाचें ] ( अुत् तम ) पु. श्रेष्ठ. सर्व+ = अीश्वर. ४८; ४७-५६; १९२.

**अुदे**–[ अुदेला ] ( अुत्-अि गतौ ) धा. वर येणें, अगवणें, अुत्पन्न होणें. १७३.

**अुदंड**–[ अुदंडें ] वि. त्रि. पुष्कळ ६३.

**अुदासीन**–[ अुदासीन ] ( अुत्–आस् ) वि.. त्रि. अुच्च भूमिकेवर असलेला, नि:संग. ५०.

**अुदासीनता** -[ अुदासीनता ] ( अुत्-आस् ) स्त्री. नि:संगत्व. ५७.

**अुद्यापन**-[ अुद्यापनें ] ( अुत् या=यापि-अन ) न. आरंभ व्रतादि कर्मांची समाप्ति. ७४.

**अुधर** -[ अुधरी, अुधरें ] ( अुत् धृ ) धा. वर काढणें, मोक्षास नेणें. २२; १३१.

**अुन्मत्त**–[ अुन्मत्त ] ( अुत् मद्-त ) वि. पु. माजलेला. १८१.

**अुन्मनी**–[ अुन्मनी ] ( अुत्- मनस् ) स्त्री. अवस्था विशेष २००.

**अुपमान्नी**–[ अुपमानी ] ( अुपमन्यु ) वि. ना. पु. परमेश्वरानें ज्याला क्षीरसिंधु दिला तो पुराणप्रसिद्ध बालक. ११६.

**अुपाधी**-–[ अुपाधी ] ( अुप आ-धा ) स्त्री. बंधन, प्रपंचपसारा. ५१, १६८.

**अुपासन**–[ अुपासना ] ( अुप-आस ) स्त्री. आराधना. ५७.

१३१, १५५; २६, ११९; ३२, ४६; ३३, २०२; ११; ३८, ४२, १२८.

**कर्ता**–[कार्यकर्ता] (कर्तृ) वि. पु. करणार. १०९.

**कर्म**–[कर्म, कर्मयोगें] (कर्मन्) न. कृति. ९, ७६, १००, १३७; १४, १७.

**कलंकी**–[कलंकी] (कल्कि) वि. ना. ईश्वराचा भावी अवतार. १२५.

**कल्प**–[कल्पकोटी, कल्पकोडी, कल्पांतकाळी, कल्पतरू, कल्पवृक्षातळीं] (क्लृप्-अ) न. (१) कल्पपरिमाणविशेष ५९, १४६. (२) मनोभिप्राय, अभीष्ट. ६०, ६१. ५९; १४६; १९१; ६०; ६१.

**कल्प**–[कल्पितां, कल्पिला, कल्पीत] (क्लृप्) धा. कल्पना करणें. ५९, १६४, १७१; १६४; १९०.

**कल्पना**–[कल्पना, कल्पनालेश, कल्पनेचेन] (क्लृप्-अन्) स्त्री. अुद्भावना. ५, ४०, ५९, १०४, १०५, १६४, १७२; ५८; ५४.

**कष्ट**–[कष्ट] (कष्ट-न) पु. क्लेश, दुःख. ७२.

**कष्ट**–[कष्टला, कष्टवीला] (कष्ट) धा. दुःख पावणें. ११६; १२१.

**कळ**–[कळे, कळेना, कळों] (कल् संख्याने) समजणें. १९२,२००; ७५, ८२, १४१, १४२, १४७, १५५, १७१, १७६, १७७, १९१; १८४.

**कळी**–[कळीलागि] (कल् गतौ) न. युगविशेष. १२४.

**कां**–[कां] (किम्) स ना. प्रश्नार्थक.

**काच**–[काचखंडे] (कच्=दीप्तौ-अ) पु. वाळु आणि अेक प्रकारच्या क्षारापासून तयार केलेली अुज्ज्वल भंगप्रवण वस्तु. ६३.

**काज**–[देवकाजी] (कार्य) न. कार्य. ४८

**काणी**–[काणी (कनीयम्) वि.त्रि अतिक्षुद्र ९०.

**कांत**–[रमाकांत] (कम्=वांछा करणें) वि. ना. पु. प्रिय, कमनीय. रमा+ = विष्णु. १३०.

**कांता**–[कांता] (कम्) स्त्री. स्त्री. १०३.

**काम**–[काम, कामकारी, कामासि, कामधेनु, कामसंगीं, पुत्रकामें, पूर्णकामें] (केम्-अ) पु. (१) षड्रिपूमधील अेक. (२) अिच्छा= पुत्रकामें.

**कुड**–[कुडी] (कूट) वि. त्रि. दांडीट, सरळ नसलेल, खोट. १३,४०.

**कुडावा**–[कुडावा] (कूट=गृह प= पालन करणें) गृहाश्रय=आश्रय= रक्षण. ६७,१२३.

**कुंटणी**–[कुंटणी] (कुट्टनी) स्त्री. व्यभिचारसंबंधिनी, दूती, वेश्या, भागवतांतील सुप्रसिद्ध वेश्या. ९५.

**कुंठीत**–[कुंठीत] (कुंठ-त) वि. त्रि प्रतिबद्ध, २००.

**कूर्म**–[कूर्मरूपें] (कु=औषत्. ऊर्मि= वेग-अ) वि. ना. पु. अवतार-विशेष. भगवान् विष्णूचा द्वितीय अवतार. १२०.

**कूसरी**–[कूसरी] (कुशलता) स्त्री. कुशलता. १५२.

**कृपा**–[कृपा] (कृप्-अ) स्त्री. करुणा ११७.१२२.

**कृपाळु**–[कृपाळु,कृपाळूपणें] (कृप्-आलु) वि. त्रि. करुणायुक्त. ५६,१८३;३६,११९.

**कृपाळूपण**–[कृपाळूपणें] (कृपाळु शब्द पहा) न. करुणायुक्त. ३६, ११९.

**केवा**–[केवा] (किं-विशेष) पु. पाड, प्रतिष्ठा. ६८.

**केवि**–[केवि] (कीदृश) वि. त्रि. कस. १६८.

**कैच**–[कैचा, कैची, कैचें] (कि-स्विद्) वि. त्रि. २५, २६; ९७, १५९; ६६.

**कैवल्य** [कैवल्य, कैवल्यदानी] (केवल -अ) न. मुक्ति. ३६, ८८; ७८.

**कैस**–[कैसा, कैसे, कैसेनि] (कीदृश) वि. त्रि. कस. १७६, १९४, १९८; १०४.

**कोटी**–[कोटी, कोटद्यानकोटी, कल्प-कोटी] स्त्री. शतलक्ष. अगण्य. १८०; १७८; ५९.

**कोठें**–[कोठे] (कुत्र) क्रि. वि. कोणच्या ठिकाणी. १९४, १९५.

**कोडी**–[कल्पकोडी] (कोटी पहा) १४६.

**कोण**–[कोण] (किं) स. ना. ११, २३, ३०, ४५, ६०, ६८, ८२, ११३, १४३, १५६, १७५, १७६, १९४.

**कोंड**–[कोंडिलें] (कुठ) धा. प्रतिबद्ध करणें. २०.

**कोण्ही**–[कोण्ही] (किं नु) वि. त्रि. १२१, १७८, १७९.

**कोदंड**–[कोदंडधारी] (कुण्=शब्द करणें. अंड=क) न. धनुष्य २८ ६८.

**कोंद**–[कोंदलेसें] (गुठ वेष्टने) धा. व्यापणें, खचून भरणें. १३९.

गज–[ गजेंद्र ] ( गज्=शब्द करणें–अ ) पु. हत्ती. ११८.

गण–[ गणाधीश ] ( गण-अ ) पु. समूह, गट.+अधीश=गणपति. १

गती–[ गती, गतीकारणें ] ( गम् ) स्त्री. पारलौकिक कल्याण. ७१, ९९, १५७; १२९.

गद्य–[गद्य ] ( गद्=व्यक्तायां वाचि) वि. न. स्पष्ट, व्यक्त. ८९.

गम–[ गमू ] ( गम्=गतौ ) धा. आक्रमण करणे. १ .

गंभीर–[गंभीर] (गम्-ईर) वि. त्रि. प्रगाढ, खोल. ६७.

गर्भ–[गर्भवासीं] (गॄ-ग्रास करणें-भ) पु. कुक्षि, उदर. आंतर्भाग. २०, २१.

गर्व–[गर्व] ( गर्व् ) पु. अहंकार. ११४, १३४.

गळ–[गळेना] ( गल्-स्रवणें ) धा. झडणें, नष्ट होणें. १४२.

गा–[गातां, गातो] (गै) धा. गान करणें. ७७; ८३.

गाज–[गाजे] ( गज् शब्दे ) धा. आवाज होणें २९, ३७ ४२.

गांठ–[गांठीं] ( ग्रथ् ) स्त्री. गांठी पडणें=प्राप्त होणें. १००, १३९

गिरी–[गिरीकंदरें] (गॄ=ग्रास करणें-ई) पु. पर्वत. ९२.

गुण–[गुणाचा, गुणावेगळी, गुणीं, गुणें, गुणेवीण, अहंतागुणें, अविद्यागुणें, दुराशागुणें] (गुण) पु. (१) प्रशंसापात्र मनोधर्म. (२) गुणें=योगाने. १; १४०; ४७; ८७, १८०; १६९; ९७, ११०, ११३, १६१, १६२, १७१: १४३; १६८.

गुप्त–[गुप्त] ( गुप्-त ) वि. त्रि. गूढ. १३८.

गुरु–[गुरु, गुरुवीण] (गॄ)पु. शिक्षादाता, अुपदेशदाता, आचार्य. १४१, १८०; १७९

गूज–[गूज] (गूह्य) वि. न. गुह्य, रहस्य. १५५, २०२.

गूढ–[गूढ] (गुह्) वि. न. रहस्यमय. १९९.

गूण–[गूण, गूणीं, गूणें] (गुण पहा). ७७, ८३; १८९; ३१.

गे–[गे] अव्यय. स्तब्धताद्योतक. २००.

गेल–[गेला, गेली, गेले] (जा धातूचें भूतरूप) २६,६२,११२,१६३; ३२,४६,७९;१४,११३,१३७.

गोडी–[गोडी] (गुड शब्दज) स्त्री. मौज. रस. ४५.

गोव–[गोविलें] (गुफ) धा. अडकविणें. १४०.

**चंद्रमोळी**–[चंद्रमौळी] (मौलि–शिरावर चंद्र असणारा) वि. ना. पु. शंकर. ८४, ८५, ९९.

**चर्म**–[चर्मचक्षीं] (चर्–मन्) न. चामडें. चर्म+चक्षु = बाह्य दृष्टि. १४९.

**चळ**–[चळेना] (चल् = कंपन) धा. चळेना. ५४, १४७, १७७.

**चांगल**–[चांगलें] (चंग–ल) वि. त्रि. सुदर, उत्तम. ८८.

**चांचल्य**–[चांचल्य] (चल्-यङ्-लुगना अ) न. अस्थिरता. ३९.

**चांडाळ**–[चांडाळ] (चंड-अल्) वि. त्रि. ज्याला कोणताहि सद्भाव किंवा दयाभाव नाहीं. मुळांत–ग्रामबहिष्कृत जातिविशेष. १०७, १२६.

**चातुर्य**–[चातुर्य] (चत्) न. नैपुण्य. १८३.

**चाप**–[चापपाणी] (चप् = क्षेपण करणें–अ) न. धनुष्य. ३५, १२२.

**चारी**–[ब्रह्मचारी, ब्रह्मच्यारी] (चर-अिन्) वि. पु. गमनशील + = कामजित्. ८७; ५०.

**चाल**–[चाल, चालणें, चाले चालताहे] (चर) धा. वागणें, वर्तणें. १०५; १३२; ४८, १३२; ४९, १८२.

**चाहुटी**–[चाहुटी] (अुच्चावचत्व) स्त्री. आचावाचा, वाह्यात् बोलणें. १८२.

**चाळकु**–[चाळकु] (चल्-क) पु. फसविणारा. हिंदीतील 'चलाक' शब्द अेतदर्थ सादृश्यासाठीं पहावा. १८१.

**चि**–[चि] (चित्) अ. समुच्चय अवधारणा अि. अर्थीं. ३, ५, ८, ११, १४, २०, ४२, ४७, ४८, ६१, ८६, ८८, ९४, १०९, ११२, ११४, ११५, १३७, १५५, १६१, १७०, १७२, १७८, १८१, १८२, १८४, १८८, १९६, १९८, २००.

**चित्त**–[चित्तीं] (चित्=बोध करणें–त)न. मन, हृदय, अतःकरण. २२, ६४, १३०.

**चिंत**–[चिंतितां, चिंतियेला, चिंतीत, चिंतीतसे] (चित् संज्ञाने)धा. स्मरणें. १४५, १९७; १६५; ३, ५८, ६७–७६; ७३.

**चिंतन**–[हरीचिंतनें] (चित्) न. स्मरण. ८९, १६५,

**जा**–[जाअिजे, जाअील, जात, जातां जातीं, जातें जावा, जावे, गेला, गेली, गेलें] (या) धा. (१) गमन करणें अु. सदा संचला येत ना जात कांहीं. (२) दूर पळणें अु. गिरीकंदरें जाअिजे दूर दोषें. (३) नष्ट होणें अु. महादोष जाती. (४) सातत्य. अु. मुक्ति भोगीत जावी.
९२; २५, १२६; १६, १४९, १९५; ९९, १५५; १५, ७१, १०१, २०५; १७, १६१ १६२; ३, ५८, ६७,; ७६; २,७, १०, ४४, ८९, १०२ ११५, १७०, १८४, १८८, १९०, २६, ६२, ११२, १६३; ३२, ४६, ७९; १४, ११३, १३७.

**जाच**–[जाची] (यम् यच्छति) धा. त्रास देणें. १०१.

**जाण**–[जाण, जाणा, जाणिजे, जाणता, जाणें ] ( ज्ञा ) धा. समजणें. १७२, १९५; ६४, १६८; १३४; ४७, १४१, १५६; १४३,१८३.

**जाणत**–[जाणता] (ज्ञा-) वि. पु. ज्ञानी, जाणणारा. १९३.

**जानकी**–[जानकीनायकाचा, जानकीवल्लभाचा ] वि. ना. स्त्री. सीता. १३१; ९१.

**जाळ**–[ जाळितो, जाळिला, जाळी जाळूं ] (ज्वल्) धा. दग्ध करणें, नष्ट करणें. १७५; ८३; १७५; ९४.

**जिण**–[ जिणावा, जिणावें ] (जि- जिनाति–जिणअि) धा. जिकणें, ७२; ११०.

**जिणें**–[जिणें] (जीवन) न. जीवन. ६५.

**जिर**–[जिरेना] (जॄ) धा. पचणें. १५९.

**जिव**–[जिवा, जिवां, जिवाचे] (जिव-अ )पु. जीव, प्राणि. १४, ७५, ७९, ८२, ९९, १३८, १४५; ३४, ८४, ८८, १३७; ७७.

**जी**–[जये] (यद्) स. ना. ४५

**जीर्ण**–[जीर्ण] (जॄ–त) वि. त्रि. पुराण. १९९.

**जीव**–[जीव, जीवदानी, जीवा, जीवीं] (जिव पहा.)
(१) प्राणि (२) प्राण–जाहला जीवदानी (३) अंतःकरण–मना सत्य संकल्प जीवीं धरावा.
१५, ९८, १३७, १४५; ११८; १८९; ५, ७, १०, ४३, ६१, १०३.

**जुन**–[जुनें] (जीर्ण) वि. त्रि. पुराण, अनादि. १७३–१४१.

**ढळ**–[ढळे, ढळेना] (धृ अवध्वंसने) धा. (१) नष्ट होणें अ. मंशयो ढळेना, (२) च्युत होणें अ. मना ना कळे ना ढळे रूप ज्याचें १९२. १४२, १९२; १४२, १४७, १७७.

**तज**–[ तजावा, तजावी, तजावें ] ( त्यज् ) धा. टाकून देणें. ६९, ७५, १३०. १७०; १८८.

**तत्काळ**–[तत्काळ] (तत्-काळ) क्रि. वि. तत्क्षणी, ताबडतोब. १८९, १९९, २०४.

**तत्त्व**–[ तत्त्वचिंतानुवादें, तत्त्वज्ञानें, तत्त्वझाडा, तत्त्वादिकें ] न. (१) ब्रह्म (२) पंचमहाभूत १५३ (३) तत्त्वादिकें=तत्त्वमस्यादि. ५२; १५३; १५२; १५४.

**तत्वतां**–[तत्त्वता] क्रि. वि. तत्त्व दृष्टीनें. ५७,९३.

**तदाकार**–[तदाकार] (तद्-आकार) वि. त्रि. तन्मय. १४८,१७०.

**तम**–[तमाचा] (तमस्) न. तमोगुण, प्रकृतीचा तिसरा गुण. ५०.

**तर**–[तरा] (तॄ) धा. पलीकडे जाणें. ८०

**तरी**–[तरी] (तर्हि) अ. विरोधी संकेत-दर्शक. २,७५,८९,१७२.

**तरु**–[कल्पतरु] (तॄ) पु. वृक्ष. ६०.

**तर्क**–[तर्क, तर्कशास्त्रें, तर्कसंपर्क] (तर्क्) पु. अनुमानादि. १०१; १५८; १९९.

**तर्क**–[तर्की] (तर्क्) धा. अनुमान करणें. १५६.

**तल्लीन**–[तल्लीन] (तत्-लीन) क्रि. वि. तन्मय. १२७.

**तळ**–[कल्पवृक्षातळी] पु. मूलदेश. ६१.

**ताक**–[ताक] (तक्र) न. चतुर्थांश जलसंयोगाने केलेला दधिविशेष. ६३.

**तानमान**–[तानमानें] (तत्=विस्तारे मान) न. गायनविस्तार=गायन. संगीत १५३.

**ताप**–[ संसारतापा ] ( तप्–अ ) पु. यातना. १०५.

**तापसी**–[तापसी] (तपस्-इन्) वि. त्रि. तप करणारा. ५०, ८४, ८५.

**तार**–[तारी] ( तॄ ) धा. तरंगवणें, उद्धरणें. ९८.

**तारा**–[ तारांगणीं, तारांगणें ] (तॄ) पु. तारका, नक्षत्र. = + तारका-युक्त आकाश.

**तारुण्य**–[ तारुण्यकाळीं ] (तरुण-य) न. यौवन. ५४.

११६,११९,१२६, १३३, १४०, १४७,१५४,१५६, १५९, १७९, १८९-१९२,१९६-१९८; ११८,१२१,१२२; १९३; ९३, ११६; १३२,१८३; ६९, १२३; ५९;२९;२०,६४,६५, ८०, ८७, ९१,१०१; १६, १९३; १६६; ८६, १९५; ११; ११३, ८७, १४१,१७५; १६.

**तोड**–[तोडी] (तुड्) धा. छेदणें २०४.

**तोडर**[तोडरीं] (तुड्=आघात करणें-र) पु. अघातद्वारें नाद अुत्पन्न करणारा पायांतील एक अलंकार. ४२.

**तोष**–[नामतोषें] (तुष्-अ) पु. आल्हाद, संतोष. ९२.

**तोष**–[ तोषला ] ( तुष् ) धा. आल्हादित होणें, संतुष्ट होणें. ९२.

**त्रय**–[लोकत्रयाचा] (त्रय) सं. वि. तिघांचा समूह. २२.

**त्रि**–[त्रिवाचा] (त्रि) सं. वि. ५३.

**त्याग**–[त्यागितां] (त्याग) धा. साडणें. ८.

**त्याग**–[भोगत्यागें, त्याग] (त्याग) पु. वर्जन, विसर्जन. १५३ ; ७६.

**त्वरा**–[त्वरें] (त्वरा) स्त्री. वेग. त्वरें क्रि. वि. = वेगानें. १२४.

**थकीत**–[थकीत] (चकित ) वि. त्रि. चकित, विस्मित. ३८.

**थरार**–[थरारी] (थर्व) धा. थरथरणें. २८, ६८.

**थोर**–[थोर] (स्थविर) वि. त्रि. श्रेष्ठ. ३, १४, २१, ९०.

**थोरल**–[थोरला] (स्थविर) वि. त्रि. श्रेष्ठ. १७९.

**दक्ष**–[दक्ष, दयादक्ष] (दक्ष्-अ) वि. त्रि. पटु, समर्थ, निपुण. ४६, १८३; १३४, १७४.

**दंड**–[दंडधारी] (दंड्-अ) पु. यष्टि, काठी. + धारी=यम. २७.

**दंडणा**–[देहेदंडणेचें] (दंड-अन्) स्त्री. दमन. ७३.

**दंभ**–[दंभ, दंभधारी] (दंभ्-अ) पु. कापटय, आंत अेक बाहेर अेक. दंभो-धर्मध्वजित्वं–शंकराचार्य. ६, ५२; ११२.

**दया**–[दया, दयादक्ष] ( दय-अ ) परदुःखनिवारणेच्छा, कृपा. १००, १०६; १३४, १७४.

**दयाळु**–[दयाळु] (दय-आलु) वि. त्रि. कारुणिक. ५६, ७४.

**दर्शन**–[दर्शनें] (दृश्-अन) न. अवलोकन. १३३.

**दुर्जन**–[दुर्जनाची] (दुर्जन) वि. त्रि. खल, दुष्ट. १२९, १३५.

**दुर्भर**–[दुर्भरातें] (दुर्-भर) वि. त्रि. ज्याचें भरण करणें कठिण= काम; पोट. ८०,

**दुश्चीत**–[दुश्चीत] (दुश्चित्त) न. वाओीट बुद्धि. १०४.

**दुष्ट**–[दुष्ट] (दुष्ट) वि. त्रि. अिष-णीय. ४.

**दुस्तर**–[दुस्तरा] (दुस्-तर) वि. त्रि. अपार. ८०.

**दूज**–[दूजें] (दुज पहा.) १४७, २०१.

**दूण**–[दूणें] (द्विगुणित) वि. त्रि. दुप्पट. ६५.

**दूरि**–[दूरि] (दूर) क्रि. वि. असं-विकृष्ट. ९२.

**दृढ**–[दृढ] (दृह्=वर्धने–त) वि. त्रि. स्थिर. २२,५४,६४,१४३,१६३, १९९.

**दृश्य**–[दृश्य] (दृश्य) वि. त्रि. ज्ञेय-मात्र. १३९, १७१, १९३.

**दृष्टांत**–[दृष्टांत] (दृष्टांत) पु. अुदाहरण. १९२.

**दे**–[दिल्हा, दीजे, द्यावा, दीधली, दे, देत, देतो,द्यावी, द्यावें] (दा)धा. (१) सहायक धा. अ्. सोडून देणें (२) देणें.
११६;३९;५, ७०, १०९, २०३; ११७; २४, १२८; ६३; १७४; १२;२,१९,४४.

**देख**–[देखतां, देखवेना] (दृश्) धा. पाहणें. २८, ९६.

**देव**–[देव, देवकाजीं, देवदेवा, देवराणा, देवरायासि, देवासि] (दिव्-अ) पु. ओीश्वर.
३१, ३५, ३६, ५५, ९३, १०४, ११६-१२६,१४४, १६४, १७६, १७८,१७९, १८९,१९४,१९५; ४८;७३; ८४,९७, १७७, १९३; १७९;४९.

**देह**–[देह, देहबुधी, देहीं, मानव-देहधारी] (दिह्–अ) पु. शरीर. ४८;१९७;१४०;९८.

**देहे**–[देहे, देहेदंडणेचें, देहेदुख, देहबुधि, देहबुधिचा, देहेबुधिचें, देहेबुधितें, देहेभान, देहेभावना, देहेरक्षणा-कारणें, देहेसंसारचिंता, देह्याचा, देह्यातीत, देह्यादीक, देह्यांती] देह पहा.
८, १०२, १९४; ७३; १०; १२, १०३, १६३, १७०; १३८, १६३, १६९, १९१; १३७; १६८; १८८; १२७; २६; ७८; १६६; १६३;१६५; २३.

**धारणा**–[धारणा] (धारणा) स्त्री. स्मरण मनोगत स्थिति. ७९.

**धारिष्ट**–[धारिष्ट] (धाष्टर्य) न. धैर्य. ७,३६,८७.

**धारी**–[दंडधारी, दंभधारी, मानवदेहधारी, वेषधारी, कोदंडधारी] (धृ-अिन्) वि. त्रि. धारण करणार. २७;११२;९८; १२६; २८,६८.

**धाव**–[ धावताहे, धावे, धावतु ] (धाव्) धा. (१) शीघ्र येणें. (२) भ्रमण करणें. अु. मना कल्पना धीट सैराट धावे. १०४. ११८, १०४, १२४.

**धीट**–[ धीट ] वि. त्रि. अप्रतिबद्ध. १०४.

**धीर**–[धीर](धीर) पु. (१) धैर्य. (२) बुद्धिमान् अु. महां धीर गंभीर पूर्ण प्रतापी. २७, ६७.

**धुंडाळ**–[ धुडाळितां ] ( अधि-तुद् अन्वेषणे) धा. शोधणें. १५७, १७६.

**धुरु**–[धुरु] (ध्रुव) वि. ना. पु. अुत्तानपाद राजाचा पुत्र. ज्याला आकाशांत अढळ स्थान मिळालें तो प्रसिद्ध बालभक्त. ११७.

**धेनु**–[कामधेनु] (धे = पान करणें-नु) स्त्री. सवत्स गाय. काम+धेनु= अिच्छा पुर्ण करणारी गाय. ६०, ६३.

**ध्या**–[ध्यातो] (ध्यै चिंतायाम्) धा. ध्यान करणें. ८३

**ध्यान**–[ध्यान] (ध्यै=चिंतायाम्-अन) न. (१) अंतःकरणाचा अेकाग्र वृत्तिप्रवाह. (२) स्वरूप. अुदा. दुजेवीण तें ध्यान सर्वोत्तमाचें. १९२. ६६

**ध्यास**–[ध्यास] (ध्यै) पु. तद्विषयक सतत चिंतन. ८४.

**न**–[न] (न) अ. निषेधार्थी. ९, २३, २५, ५२, ५३, ७२, ७३, ८१, ९०, ९१, १२१, १२८, १४६, १४७, १४९, १५७, १७८, १७९, १८७, १९०, १९२, १९८, १९९.

**नको**–[नको] (व-कग्) धा. निषेधार्थी. अुदा. नको रे मना क्रोध हा खेदकारी. ४-६, ९, १२, १८-२०, २५, ४३, ५८, ६५, ८१, ९१, १३२, १६०.

**नभ**–[नभाचे, नभासारिखें, नभीं, नभें,], (नभ्-अभावे) न.आकाश. १९५; १९७; १९६; १९८.

**नम**–[नमू] (नम्) धा. वंदन करणें. १.

(१)श्रेष्ठ,(२)पति. २२; २४; २७;१३१.

**नायका**–[रतीनायकेचा] (नायिका) स्त्री. स्त्री. १२९.

**नायेक**–[ रघूनायेका, रघूनायेकाचा, रघूनायेकाविण] (नायक पहा.) ४२, १९८; ९१;४३,४६.

**नारायण**–[नारायणाचेनि] (नारायण) वि. ना. पु. अजामिळाच्या पुत्राचें ठेवलेले नांव. ९५.

**नावड**–[नावडे] (न-आ-वृध्) धा. अप्रिय वाटणें. १०१.

**नाहीं**–[नाहीं] (न-अस)धा. अभावार्थी २३,४१,४९-५१,५९, ७२, ७८, ९७, १४०, १४५, १५०,१७०, १९५,१९६.

**निःकाम**–[निःकाम] (निःकाम)वि.त्रि कामशून्य. ५८,७७.

**निज**–[निजधाम] (निज) वि. त्रि. आपल. ८६

**निजध्यास**–[निजध्यास] पु. अेकतानतेचा निरंतर प्रयत्न. ४३, ६२, ८१.

**नित्य**–[नित्य] (नित्य)क्रि. वि. सतत. ४८,५७,७०,९६,९९.

**निधी**–[निधी] (निधि) पु. भूमिगत द्रव्य.६०.

**निंदकु**–[निंदकु] (निंदक)वि. पु. निंदा करणारा. १८१.

**निंद्य**–[निंद्य] (निंद्य)वि. त्रि. गर्ह्य, दूषणीय. २,१८८.

**निम**–[निमाला] (नि-मी) धा. नाश पावणें. १४.

**निराकार**–[निराकार] (निराकार) वि. त्रि. आकाररहित. १४८.

**निराभास**–[निराभास] (निराभास) वि. त्रि. आभासशून्य. १७१.

**निरोध**–[निरोधें] (निरोध)पु. वेष्टन अवरोध बंधन. २०.

**निर्गुण**–[ निर्गुणाचा, निर्गुणालागि, निर्गूण] वि. त्रि. सत्त्वादि त्रिगुणरहित परमात्मा किंवा ब्रह्म. १;१८९;१६४,१६९,१७१,

निर्द्वंद्व–[ निर्द्वंद्व ] (निर्-द्वंद्व) वि. त्रि. शीतोष्ण किंवा राग-द्वेषादि द्वंद्वरहित. ७७.

**निर्म**–[निर्मिली] ( निर्-मा ) धा. अुत्पन्न करणें. १८९.

**निर्माण**–[निर्माण] ( निर्-मा-अन ) वि. त्रि. अुत्पन्न. १७९.

**निर्मित**–[निर्मिता] (निर्-मा)वि. त्रि. निर्माण करणारा. १७५.

**निर्मूळ**[निर्मूळ] (निर्मूल) वि. त्रि. मूलरहित, विनाश. ८८.

**नेण**–[नेणती, नेणा] (न–ज्ञा) धा. न जाणणें. १२६, १९३; ८४.

**नेणत**–[नेणता] (न–ज्ञा) वि. त्रि. अजाण. १९३.

**नेम**–[नेमिला] (नियम) धा. निश्चित असणें. ८५.

**नेम**–[नेम, नेमें] (नियम) पु. निश्चित विशिष्ट क्रिया. ८५; ५७, ७०.

**नेमस्त**–[नेमस्त] (नियमित) वि. त्रि. निश्चित. २८, ९८, १३२.

**न्याय**–[न्याय] पु. तर्कशास्त्र. १५८.

**पक्ष**–[पक्ष] (पक्ष) पु. बाजू. १७४.

**पच**–[पचे] (पच्) धा. अुकडला जाणें. २०.

**पंचीकर्ण**–[पंचीकर्णे] (पचीकरण) न. वेदांतांतील प्रक्रियाविशेष. १५४.

**पड**–[पडेना] (पद्) धा. संपादलें जाणें १००, १३९.

**पंडीत**–[पंडीत] (पंडित) पु. अहंकारी शास्त्री. केवळ शब्दज्ञानावर मिरविणारा. ११३

**पती**–[पती] (पति) पु. स्वामी. १२९.

**पद**–[पदीं] (पद) न. पाय. २९, ३२.

**पदार्थ**–[पदार्थी] (पदार्थ) पु. वस्तु. ५८.

**पंथ**–[पथ, आरण्यपंथें, भक्तिपंथें, मृत्यपंथें] (पथ) पु. मार्ग. १; १२३; २, ११५; १४.

**पर**–[परब्रह्म, परद्रव्य, परा] वि. त्रि (१) दुसऱ्याचें (२) पलीकडचें. १९१; १०३; ८०.

**परा**–[परेहूनि] (परा) स्त्री. परा वाचा. १९०,

**पराव**–[परावी] (परकीय) वि. त्रि. परकीय. १०३.

**परी**–[नानापरी, बहूतांपरी] पु. प्रकार. १०४; ४२, ७४.

**परी**–[परी] (परं) अ. परतु. ८, १४, २६, ४१, ८३, १०४, ११२, १२६, १३७, १४३, १५१, १५२, १६२, १६५, १६८, १७५, १७८, १८७–१९०, १९४, १९५, २०२.

**परीक्षा**–[परीक्षेविणें] (परीक्षा) स्त्री. खऱ्या खोटयाचा निर्णय. १४३.

**पर्ता**– [पर्ता] (पर) वि. पु. पलीकडचा. १९०.

**पष्ट**–[पष्ट] (स्पष्ट) वि. त्रि. स्फुट, अुघड. १३७.

**पां**–[पां] अ. संबोधनद्योतक. १३, ९३.

**पाठि**–[पाठिलागि] (पृष्ठ) स्त्री. पाठ. १३.

**पाळु**–[दासपाळु] ( पालक ) वि. पु. पालन करणारा. ५६.

**पिता**–[पिता] (पिता) पु. बाप ९६.

**पिंड**–[पिंड, पिंडज्ञानें] पु. शरीर. १८७; १५३.

**पिपाशा**–[पिपाशा] (पिपासा) स्त्री. तृष्णा, तहान. ५५.

**पीत**–[पीत] (पीत) वि.त्रि. हरिद्रावर्ण. १५०.

**पीसें**–[रामपीसें] (विभ्रंश) न. वेड. ९२.

**पुढें**–[पुढें] (पुरस्) क्रि.वि. पुरोभागीं, पुढील काळीं, नंतर. ३,१६,२५, २६,२८,६१,६३,६६, ६८, ९७, १२३,१२५,१३९,१४४,१४६.

**पुण्य**–[ पुण्य, पुण्यठेवा, पुण्यरासी ] (पुण्य) न. धर्म, सुकृत. १००,१३३,१३९; ७१; ९९.

**पुत्र**–[पुत्रकामें, स्त्रियापुत्रमित्रादिकें] पु. तनय, सुत. ९५; १६६.

**पुराण**–[ पुराणां, पुराणी, पुराणीं, पुराणें] (पुरा-न) न. व्यासादि मुनिप्रणीत ग्रंथविशेष. १९३; ९५; ३४, ९०; १८, ३९.

**पुर**–[पुरेना] (पॄ) धा. पूर्ण होणें. १६, १९७.

**पुरी**–[पुरी] (पुर्-ङीप) स्त्री. नगरी = अयोध्या. २९.

**पुष्ट**–[पुष्टिभागीं] (पृष्ट) न. पाठ. १२०.

**पुस**–[पुसावा, पुसे] (पृच्छ्) धा. विचारणें. १६९,१९४.

**पूज**–[पूजिताहे] (पूज) धा. पूजा करणें. १७८.

**पूढिल**–[पूढिलाचें, पूढिलांसि] (पुरस्) पुढचे, आजूबाजूचे = अन्य वि. त्रि. दुसर. ९; १६०.

**पूर्ण**–[पूर्णकामें, पूर्णप्रतापी] (पूर्ण) वि. त्रि. परिपूर्ण. ७०; ६७.

**पूर्वज**–[पूर्वजांसि] (पूर्व-ज) पु. वाडवडील. ९९.

**पूस**–[पूसे] पुस पहा. ८२

**पोट**–[पोटीं, मायपोटीं] न. (१) अुदर (२) अंतःकरण = पुढें देखतां काळ पोटीं थरारी. २८, १५९, १८२, १९७; २०.

**प्रताप**–[प्रतापें, स्वामीप्रतापें] (प्रताप) पु. पराक्रम. ३१; १९९.

**प्रतापी**–[पूर्ण प्रतापी] (प्रतापिन्) वि. त्रि. पराक्रमी. ६७.

**प्रपंच**–[प्रपंच] (प्र-पच्) पु. संसार, विस्तार, पसारा. १६५.

**बाण**–[बाण] (बाण) पु. शर. १३१

**बाण**–[बाणे] (वर्ण्) धा. मनावर ठसणें. ३९, १८३.

**बाध**–[बाधिजे, बाधूं, बाधिजेनापदा] (बाध्) धा. पीडा करणें. ७८; ८७, १६८; ७०.

**बाधु**–[संगबाधु] (बाध) पु. पीडा. १८१.

**बांध**–[बांधिलें] (बंध्) धा. स्वीकारणें. १४३.

**बा**–[बापा] (वा्) अ. सबोधनद्योतक १०५.

**बापुड**–[बापुडें] वि. त्रि. अनाथ. ११७.

**बाळक**–[बाळकासी] (बालक) न. मूल. २०

**बुड**–[बुडाला, बुडाली, बुडालें] धा. (१) नष्ट होणें अुदा. आनंद भेदें बुडाला. (२) मग्न होणें अुदा. मनोवासना रामरूपीं बुडाली. ६२; १२७; १३, १९६.

**बुधि**–[बुधि, देहेबुधि, देहबुधिचा, देहेबुधिचें, देहेबुधितें] (बुद्धि) स्त्री. (१) आसक्ति. अुदा. देहेबुधि. (२) चित्त. अुदा. मना बुधि हे साधुसंगीं वसावी. १०७; १२, १०३. १६३, १७०; १३८, १६३, १६९, १९१; १३७; १६८.

**बुधी**–[आत्मबुधी, देहबुधी, स्वार्थबुधी, बुधी] बुधि पहा. १६३; १९७; ९, ५१; ६४.

**बुद्धि**–[बुद्धि] बुधि पहा. १६२.

**बुद्धी**–[पापबुद्धी] बुधि पहा. ४.

**बोध**–[शास्त्रबोधें, हरीबोध, रामबोधें] (बुद्ध-अ) पु. तद्विषयक ज्ञान. १५७; ६३; १२७.

**बोध**–[बोधताहे, बोधवीजे, बोधितां] (बुध्) धा. समजणें. १५१; ४१; १५१.

**बोध्य**–[बोध्य] (बुद्ध) वि. ना. पु. विष्णूचा अेक अवतार. १२४.

**बोल**–[बोलणें, बोलण्याचा, बोलण्यासारिखें, बोलतां, बोलती, बोलिजे, बोलिजेतें, बोलिली, बोलिलें, बोलिल्यासारखे, बोले, बोलें, बोलों] (वल्ह्) धा. बोलणें. ७, ५१, १११; २५; ४९, १०५, ११५; २३, ९५, १०१, ११४; १५; ९१; १०४; ९०; १६१; १८२; ३४, ५३, १३२, १७९; २३, १८४; ४३, १३२.

**ब्रह्म**–[ब्रह्म, ब्रह्मच्यारी, ब्रह्मचारी, ब्रह्मराक्षेस, परब्रह्म, ब्रह्मादिकांचा,

(भाव)पु. (१) अनुराग. अु. भक्तिभाव. (२) जाणीव. अु. अहंभाव. (३) पणा, त्व. अु. भिन्नभाव. ३५, १३५ ; २, १०२; १०८ ; ५५, ६९, १०६; ११०, ११५, १४५, १५९, १६० ; १८५.

**भाव**–[भाविजेतो]धा. भावना करणें, समजून घेणें. १५४.

**भावना**–[भावना, देहेभावना[ (भावना) स्त्री. (१) ध्यान. (२) आसक्ति. अु. देहेभावना ७९; १२७.

**भाषण**–[भाषणें] (भाषण न. बोलणें. १३३.

**भास**–[भासलें, भासे] (भास्) धा. (१) भासमान होणें. (२) वाटणें. १८७; १३९, १७१.

**भाळ**–[भाळीं] (भाल) न. कपाळ. १७५.

**भिन्न**–[भिन्नभावें] (भिन्न) वि. त्रि. वेगळ. १८५.

**भी**–[भीतोस] (भि) धा भिणें. २७.

**भू**–[भूमंडळीं(भू) स्त्री. पृथ्वी. ३०

**भूत**–[भूतीं, भुतें] (भूत) न. (१) पंचमहातत्त्वें. (२) प्राणि अु० दया सर्व भूतीं. १००, १०६; १८७.

**भूमी**–[मृत्यभूमी] (भूमि) स्त्री. स्थान. १५.

**भूलि**–[भूलि] (भुर् वैदिक) स्त्री. भ्राति ७९.

**भेट**–[भेटवी] (अभि-अत्) धा. प्राप्त करणें. २१.

**भेटि**–[भेटि] (अभि-अत्) स्त्री. (१) समागम (२) प्रत्यक्षीकरण. ११७ १७०, २०१.

**भेटि**–[भेटी, रामभेटी] भेटि पहा. १८६;५९.

**भेद**–[भेद, भेदे] पु. विभाग, द्वैत. १६०; ६२.

**भोग**–[भोग, भोगत्यागें.] (भुज्–अ) पु. अुपभोग. ७६; १५३.

**भोग**–[भोगणें, भोगी, भोगीं भोगीत] (भुज्) धा. उपभोग घेणें. ९, ११, १७; १३४; २०५; १२.

**भोजन**–[ भोजनाची, भोजनीं ] (भोजन) न. जेवण. १५९; ८९.

**भोंदु**–[ द्रव्यभोंदु ] ( अभि-अुत्-द्दु कौटिल्ये) वि. पु. फसविणारा. १८१.

**भ्रम**–[भ्रमाचा, भ्रमें, भ्रमे] (भ्रम) पु. मिथ्याज्ञान, भ्रांति. ४९; १३८, १४३; १४४.

१४, ३१, ६७, ६८, ७१-७३, ९६, ११८, १२१, १२६, १३५ २०३; २२, ७८, १५४.

**मही**–[मही] (मह्=पूजाकरणें-ई) स्त्री. पृथ्वी. १८९.

**माग**–[मागतां, मागे] (मांक्ष-कांक्षायां) धा. याचणें. ६३; ६३.

**मागें**–[मागें] (मा-अग्रे) क्रि. वि. नंतर, बाजूला. ८, १२४.

**मागुत**–[मागुता] (मा-अग्र) वि. त्रि. नंतर. १६, २५, ६१, १९४.

**माजि**–[वोळखीमाजि] (मध्यें) अ. आंत. २०१.

**माता**–[विश्वमाता] (माता) स्त्री. आई. ९४.

**मांडू**–[मांडू] (मंड) धा. मंडन करणें. १९.

**मान**–[मानला, मानली, मानिताती, मानी, मानीं, मानीत, मानू] (मन्)धा.
(१) आवडणें–अ. जया मानला देव तो पूजिताहे. (२) समजणें–अ. चिरंजीव हे सर्व ही मानिताती. (३) ती क्रिया करणें. अ. खेद मानणें.
१७८; १७८; १५; १७; २८; १०; २५, ९१.

**मानव**–[मानव, मानवदेहधारी, मानवा मानवां, मानवाची, मानवाला, मानवी] (मनु-अ) पु. मनुष्य. १७; ९८; ६८, ७९, ८२, १०४, १४३; ३४, ८८; १८; १०६; ३.

**मानस**–[मानसीं, मानसीचा] (मानस) न. चित्त. १२, ४३, ५५, ९२, १३३, १३६, २०१; १५९.

**मांदर**–[मेरुमांदर] (मंदर) पु. पर्वत-विशेष. ३३.

**माय**–[मायपोटी] (मातृ) स्त्री. माता, आई. २०.

**माया**–[माया] (माया) स्त्री. अविद्या. १७२.

**मार**–[मारी] (मृ)धा. नष्ट करणें. ८७.

**मारुती**–[मारुती] (मारुति) वि. ना. पु. हनुमान्. ८७.

**मार्ग**–[भक्तिमार्गें] (मार्ग) पु. पंथ, रस्ता. १८८.

**मार्तंड**–[मार्तंड] (मार्तंड) पु. सूर्य. ३७.

**मावळ**–[मावळेना] (मी-वल्) धा. कमी होणें. १९१.

**माळा**–[मेघमाळा] (माला) स्त्री. श्रेणी. ३३.

